




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

# भाषा आणि जीवन

मराठी अभ्यास परिषद पत्रिका

वर्ष २७ ■ अंक ४ ■ दिवाळी २००९

उत्साहाने घरचा आकाशकंदील
करण्याच्या वयात त्यांना
परोपरीने सजवून विकणारी
ही मुले या दिवाळीची
खरेदी करीत हिंडणाऱ्या
श्रीमंत गर्दीची कुणीच लागत नाहीत...

अनुक्रमणिका








**संपादक :** प्र० ना० परांजपे

**संपादन-सल्लागार :** अशोक रा० केळकर, कृष्ण श्री० अर्जुनवाडकर, आशा मुंडले, द०भि० कुलकर्णी, मॅक्सीन बर्नसन

**संपादन-समिती :** प्र०ना० परांजपे (प्रमुख), नीलिमा गुंडी, मृणालिनी शहा, विजय पाध्ये, आनंद काटीकर

**लेखन व परीक्षणार्थ पुस्तके पाठविण्याचा पत्ता :** प्र०ना० परांजपे, सी-1, सुरुजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे 411 007.
दूरभाष (020) 2569 4617 **भ्रमणभाष :** 94225 09638

**प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय पत्रव्यवहार व वर्गणी पाठविण्यासाठी पत्ता :**
आनंद काटीकर, द्वारा, मृणालिनी शहा, 1, शीतल अपार्टमेंट्स, 46/4, एरंडवणे, पुणे 411 004. भ्रमणभाष : 94216 10704

**मुद्रण-स्थळ :** एम०आर० अॅण्ड कं०, सदाशिव पेठ, पुणे 411 030. दूरभाष : (020) 24475939

---

मराठी अभ्यास परिषदेच्या **www.marathiabhyasparishad.com** या संकेतस्थळाचे व्यवस्थापक : **चित्तरंजन भट** - 93731 04903 **विजय पाध्ये** - 98220 31963.

---

(१) वार्षिक वर्गणी भरण्यासाठी **पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर** असे आहे. जानेवारी २०१०पासून वार्षिक वर्गणी - **विद्यार्थ्यांसाठी** रु० ७५/-, **व्यक्तींसाठी** एका वर्षास रु० १००/-; पंचवार्षिक वर्गणी रु० ४५०/-, **संस्थांसाठी** एका वर्षास रु० १५०/-; पंचवार्षिक वर्गणी रु० ६५०/-.

(२) मराठी अभ्यास परिषदेची **आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) वर्गणी रु० १,०००/- आणि नोंदणी शुल्क रु० १००/-**. आजीव सदस्यांना 'पत्रिकेचा'चा अंक पाठवला जातो.

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना :** वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, किंवा धनादेशाने देता येईल. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये. (पाठवल्यास आपला पत्ता पिनकोड क्रमांकासह न विसरता लिहावा.)** धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. **धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास आणि 'अॅट पार' नसल्यास रकमेत रु० ५०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) **जानेवारी २०१०पासून जाहिरातीसाठी दर :** पूर्ण पान रु० ३,०००/-, अर्धे पान रु० २,०००/-, आवरण-पृष्ठ (क्र० ४ = मलपृष्ठ) रु० ५,०००/-, विशेष रंगीत पृष्ठ रु० १०,०००/-

---

**प्रकाशन : त्रैमासिक :** जानेवारी(हिवाळा), एप्रिल(उन्हाळा), जुलै(पावसाळा), ऑक्टोबर(दिवाळी)

**सूचना :** (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही. (२) **या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.**

**या अंकाची किंमत रु० २५/-**

अनुक्रमणिका

## अनुक्रमणिका



मुखपृष्ठ : सुप्रिया खारकर.

मुखपृष्ठावरील ओळी द०भा० धामणस्कर यांच्या ''कंदील विकणारी मुले'' या कवितेतून. संग्रह : बरेच काही उगवून आलेले... पृष्ठ ३. मौज प्रकाशन. २००१

अनुक्रमणिका








# (भाषा) शिक्षणाचा खेळ(खंडोबा)

नवीन शैक्षणिक वर्ष सुरू होण्याच्या सुमारास शिक्षण मंत्र्यांना जाग येते आणि विविध शासकीय आदेश, धोरणे व योजना जाहीर होऊ लागतात. त्यातून सरकार आणि/किंवा शिक्षणमंत्री नवीन असेल तर विचारायलाच नको. काय करू आणि काय नको असे त्यांना होऊन जाते. 'ज्याचे हाती शिक्षणाच्या नाड्या तोच देशाचा (व भावी पिढ्यांचा) उद्धारकर्ता' असे वाटत असल्याने आपल्या शैक्षणिक, सामाजिक व राजकीय व्यक्तिमत्त्वाच्या पोतडीतून नवनवीन चिजा ते काढू लागतात. पाचवीऐवजी आठवीपासून इंग्रजी सुरू करण्याचा १९४८ सालचा खेर मंत्रिमंडळाचा निर्णयच पाहा. त्याचा परिणाम इंग्रजीचे महत्त्व वाढण्यात, इंग्रजी माध्यमाचे स्तोम निर्माण होण्यात आणि शेवटी पहिलीपासून इंग्रजी सुरू करण्याचा निर्णय घेण्यात झाला. असे निर्णय घेताना पुरेसा गृहपाठ, संभाव्य ताबडतोबीच्या व दीर्घकालीन परिणामांचा विचार होतो की नाही अशी शंका त्यामुळे निर्माण होते.

दहावीच्या परीक्षेमध्ये अनुत्तीर्ण झालेल्यांना एटीकेटी (अलाऊड टु कीप टर्म्ज), अकरावीच्या प्रवेशासाठी ९०%-१०%चा निर्णय, गेल्या वर्षीचा पर्सेण्टाइलच्या निर्णयाचा फियास्को, महाराष्ट्रात माध्यमिक शालान्त शिक्षण मंडळाचा शिक्षणक्रमच शिकवण्याची सर्वच शाळांना सक्ती करण्याचा विचार, अकरावीचे प्रवेश 'ऑनलाईन' पद्धतीने करण्याचे प्रयत्न अशा अनेक गोष्टी ताज्या आहेत. त्यातच दहावीची माध्यमिक शालान्त परीक्षाच रद्द करण्याच्या केंद्रीय मनुष्यबळ विकास मंत्री कपिल सिब्बल यांच्या निर्णयाची भर पडली आहे. याच संदर्भात आपल्या राज्यातील शाळांमध्ये कन्नड माध्यमाची सक्ती करण्याचा कर्नाटक सरकारचा निर्णय व त्यासंबंधीचे उच्च व सर्वोच्च न्यायालयांतील दावे व त्यांवरील निर्णय आठवतात. शिक्षण हा विषय घटनाकारांनी राज्य व केंद्र सरकार या दोहोंच्याही अखत्यारीत ठेवलेला असल्यामुळे असा गोंधळ होत असावा असे ठरवून आता केंद्र सरकारने या बाबतीतले राज्यांचे अधिकार कमी करण्याचा किंवा ते मर्यादित करण्याचा विचार सुरू केला आहे.

शिक्षणात भाषेचा (खरं म्हणजे भाषांचा) दुहेरी संबंध येतो; एक विषय

म्हणून आणि कोणताही विषय शिकण्या-शिकविण्याचे माध्यम म्हणून. पण या वस्तुस्थितीकडे आपण पुरेशा गंभीरपणाने पाहात नाही. मुळात कार्यक्षम वापर करण्याइतकी भाषा आत्मसात होण्याआधीच - आणि इंग्रजी (किंवा प्रमाण मराठी)च्या बाबतीत घर, परिसर व वातावरण यांत ती किती प्रमाणात उपलब्ध आहे याचा विचार न करता - आपण तिच्यावर अन्य विषयांचा भार टाकतो. त्यामुळे विद्यार्थ्यांच्या शिकण्यापेक्षा विद्यार्थ्यांना शिकवण्याचा आपल्याला आटापिटा करावा लागतो. त्यातून ३५% गुणांना 'उत्तीर्ण' मानणे, अनुत्तीर्णांचे प्रचंड प्रमाण, त्यामुळे होणारी गळती, आत्महत्या, बेकारी असे प्रश्न निर्माण होतात.

महाराष्ट्र शासनाने मायक्रोसॉफ्ट कंपनीबरोबर केलेला करार हा अलीकडे उजेडात आलेला विषय. मूळ करार तीन वर्षांपूर्वीच करण्यात आला आहे. त्यानुसार मायक्रोसॉफ्ट कंपनी संगणक शिक्षक तयार करणार, ते शिक्षक इतर शिक्षकांना शिकवणार आणि त्यांच्यामार्फत महाराष्ट्रातले सारे विद्यार्थी संगणक-शिक्षित होऊन नोकऱ्या व व्यवसायांसाठी तयार होणार! या सगळ्यात आपण पुन्हा एकदा बौद्धिक गुलामगिरीकडे वाटचाल करण्याची शक्यता आहे. मायक्रोसॉफ्टच्या सॉफ्टवेअरची सक्ती, इंग्रजी अपरिहार्य ठरण्याची शक्यता आणि हे शिक्षण मराठीतून उपलब्ध झालेच तर त्या मराठीची संभाव्य भीषण अवस्था या सगळ्यातून आपण करत असलेला शिक्षणाचा व विशेषत: भाषा शिक्षणाचा खेळखंडोबा अधोरेखित होतो.

प्राथमिक व माध्यमिक शिक्षणाच्या पायावर उच्च शिक्षणाचा डोलारा उभा असतो. आपला हा पायाच कच्चा व डळमळीत आहे. कोठारी, राम जोशी, यशपाल यांच्या अहवालांची अंमलबजावणी करण्याऐवजी नवनवीन समित्या नेमण्यात व त्याद्वारे काहीतरी 'भरीव' काम केल्याचे समाधान मिळविण्यात आपण धन्यता मानतो. व्यावसायिक शिक्षणाच्या पुरेशा सोयी नसल्यामुळे महाविद्यालये ओसंडून वाहात आहेत हे लक्षात घेत नाही.

शिक्षणाचा आणि विशेषत: भाषा शिक्षणाचा हा खेळखंडोबा कोण, कसा व केव्हा थांबवणार हाच खरा आपल्या पुढचा प्रश्न आहे.

■

**- प्र०ना० परांजपे**



अनुक्रमणिका

# यावनी भाषा

**ब्रह्मानंद देशपांडे**

माझा जन्म आणि शिक्षण विदर्भात झालेले. पण थोरले बंधू नोकरीसाठी मराठवाड्यात असल्यामुळे सुटीत त्यांच्या नोकरीच्या गावी जाणे होई. मी अकरावीची परीक्षा उत्तीर्ण झालो तेव्हा ते सेल्लू (जिल्हा जालना) येथे श्री० खापरखुंटीकरांच्या वाड्यात राहात होते. (त्याआधी ते वसमतनगर येथे श्री० मडके यांच्या वाड्यात राहात होते.) माझ्या परीक्षेचा निकाल मला सेल्लू येथे तारेने समजला. मी लगेच शेजारच्या वेदपंडित शास्त्रीबुवांच्या पायांवर डोके ठेवले. नंतरचा संवाद असा : 'कामियाब झालात की' शास्त्रीबोवा. 'हो' माझा होकार. 'अव्वल (प्रथम क्रमांक) आलात की–?' 'नाही. दहावा आलो.' मी. 'तुमचा नतिजा (निकाल) काय पयाममधी छापून आला की?' पयाम (संदेश) नावाचे वृत्तपत्र निजामाच्या अमलात निघत असे. तेव्हा मी म्हणालो की माझा निकाल 'तरुण भारत'मध्ये छापून आला आहे. यावर ते म्हणाले, 'की तुमच्या इंग्रजी 'पयाम'ला काय तरुण भारत म्हणतेत काय की?' निजामाचा प्रदेश ती मोगलाई आणि इंग्रजी अमलाखालील ती इंग्रजी असं विभाजन होते. शास्त्रीबुवांचा शेवटचा प्रश्न असा, 'आता काय कालेजात शिरकत (प्रवेश) करता काय की.'

परभणीला महेबूबगंजात आम्ही श्री० देविदासरावजी पेडगावकर यांच्या बंगल्यात राहात होतो. फार सुस्वभावी गृहस्थ. ते एकदा म्हणाले, 'ब्रह्मानंदजी! पहा कसा कुदरती नजारा आहे' (स्वर्गीय दृश्य) आता हे दृश्य कुठे म्हणून मी इकडे तिकडे पाहू लागलो तर ते म्हणाले, 'ती कुत्री जनलीय. पिल्लांना चाटायलीय. कसा मादराना जजबा गालिब झालाय तिच्यावर!' (मादराना जजबा = मातृत्वाची भावना, गालिब होणे = प्रभावी होणे.)

एका वकीलसाहेबांनी तर आपल्या सौभाग्यवतीला 'चांगली कुशादा (विस्तीर्ण) पत्रावळ असता ++ दरकिनार (अगदी कडेला) नमक परोसतीस (वाढतीस)' असं खडसावल्याचाही किस्सा आहे.

मराठवाड्यातील मुले शिकायला हैदरावादेला जायची. एका पालकाने आपल्या चिरंजीवांना लिहिलेले हे पत्र. चिरंजीव ++ यास अ० ऊ० उ० वि०





अनुक्रमणिका

तुझा खैरियतनामा वसूल झाला. (कुशल पत्र पावले) ज्या ज्या मजामीनमध्ये (विषयांमध्ये) कामियाब (उत्तीर्ण) होण्याचे इमकानात नसतील (संभावना नसेल) त्या त्या मजामीनच्या मुदर्रिसांना भेटून पुरजोर कोशीस (जोरदार प्रयत्न) करणे. वर्ना (नाही तरी) मी रूबरू हैदराबादेस येतच आहे.

परभणीला जाणेयेणे अनेकदा झाले. ही १९५६-५७ ची गोष्ट. तिथं लोकांच्या बोलण्यात उर्दू शब्दांचा भरणा फार मोठा. तातिल (सुटी), मुरासिला (शासकीय पत्रक), बहस (न्यायालयातील बाजू मांडणे), जिरह (तोच अर्थ), सुलहनामा किंवा तसफिया (समझौता, तडजोड), मुवक्किल (अशील), बकारा (पोचपावती), नाजर (प्रमुख), महकमा (खाते), ब-एत-नामा (पत्राद्वारे) अशा शब्दांचा भडिमार असे. पूजा तकमिल (पूर्ण) झाली, प्रसाद तकसीम (वाटून) करून टाका असंही म्हटलं जायचं. पण परभणीचा खास तक्रिया कलाम (बोलण्यात सतत येणारा शब्द) म्हणजे बा-हर-हाल (सर्व परिस्थिती लक्षात घेऊन). याचा उच्चार बारहाल असा गडबडीने केला जायचा. उदाहरणार्थ, बारहाल गेलो, वकीलसाहेबांना भेटलो, बारहाल त्यांना सगळं सांगितलं, आता बारहाल ते काम होऊन जाईल. एकदा मी एका वकीलसाहेबांनाच विचारले की हे असं सारखं सारखं बारहाल काय म्हणतात हो? त्यावर त्रासिक चेहरा करून ते म्हणाले 'बारहाल त्याला कांही मतलब (अर्थ) नाही हो पण बारहाल म्हणतेत झालं.'

उर्दूनं आपलं साम्राज्य अगदी खेड्यापाड्यापर्यंत विस्तारलं होतं. औंढे (नागनाथ, जिल्हा हिंगोली) या गावाजवळच्या चोंढी गावी शिलालेखाचे ठसे घ्यायला मी आणि श्री० विजय सोनी गेलो. लेखाची शिळा एका मराठी सद्गृहस्थाच्या दाराशी ठेवलेली आणि त्यांच्या घरी लग्नसमारंभ. ते 'जेवूनच जा. रसम झाली की वाढतो' असं म्हणाले. थकले भागले आम्ही मांडवात बसलो. लग्नात रसम सांबार वगैरे करतात का यावर बोलणं झालं. अर्ध्या तासानंतर रसम म्हणजे दाक्षिणात्य पदार्थ नसून रस्म (विधी, लग्नविधी) हा प्रकाश पडला.

आवंदा पानी (पाऊस) जाफा (इजाफा, ज्यास्त) झाला, गुरांना अलप (दानापाणी, अरबी शब्द) देऊन ये, इथपर्यंत उर्दूचा संचार होता.

■

'ऐतिहासिक', 14, अनुपम वसाहत
श्रेयनगर, औरंगाबाद 431 005
दूरभाष : (0240) 2336606

# तीन अनुवादित कविता

**नरेश मेहता***
**अनुवाद - बलवंत जेऊरकर**

### १. आविर्भाव

पाहण्याच्या बिंदूवर -
एक पूल
ऐकण्याच्या किनाऱ्यावर -
एक वाद्य
स्पर्शाच्या क्षितिजावर -
एक देह
स्वादाच्या आवाक्यावर -
एक फळ
वासाच्या व्यासावर -
एक सुगंध
आणि आठवणीच्या आकाशात -
काही निघून गेलेले क्षण

असं कुठं - कुठं
कोणकोणत्या रूपात भटकावं लागतं कुणास ठाऊक
आणि तेव्हा कुठं उद्गारते -
एक कविता.

* नरेश मेहता - हिंदीतील सुप्रसिद्ध कवी, कथाकार, कादंबरीकार आणि साहित्य-चिंतक. प्रमुख ओळख कवी म्हणूनच. आठ कवितासंग्रह आणि चार खंडकाव्यांसह पाच कादंबऱ्या आणि एका कथासंग्रहानं त्यांनी हिंदी साहित्य-संपदेत मोलाची भर घातली. कवितेचे वैष्णव व्यक्तिमत्त्व म्हणून त्यांनी कवितेबाबतची तीन पुस्तकेही लिहिली. इतर प्रमुख पुरस्कारांसहित ज्ञानपीठ पुरस्काराचे ते मानकरी होते. साहित्य - अकादमी - पुरस्कृत 'अरण्या' या त्यांच्या कविता-संग्रहातील तीन कवितांचे मराठी अनुवाद.

## २. भव्यतेचं भय

काल मी एका शब्दाला विचारलं
- कविता होशील?
शब्द म्हणाला
- त्यानं काय होईल?
- कविता तुझी रचना करेल
रचना होणं म्हणजे अर्थ प्राप्त करून घेणं असतं.
- पण रचल्यानंतर
मी कुठं असेन?
- आत्ता जो हा फक्त ध्वनी आहे - 'मी'
अर्थ मिळाल्यानं त्याची कविता होईल
आणि कविता भव्यता निर्माण करते.

पण बहुतेक भव्य होण्याच्या भीतीनं
शब्द गांगरून गेला.
ओंजळीतून निसटून सरोवरात पडलेल्या पाण्यासारखा
पुन्हा गर्दीत विलीन झाला.

शब्द होता -
रचना असता तर कविता झाली असती
पण
शब्द-सत्ता आणि शक्यता गमावल्यानं
पुन्हा गोंगाट बनला आहे.

## ३. विलयन

शब्द माझ्या जवळ आला
आणि मला म्हणाला
- मला तुझी भाषा नको
स्वत्व बनव
आणि तो त्याच्या भाषा - व्यक्तिमत्वावरचे
अर्थ उतरवू लागला
जणू काही अर्थ म्हणजे कात होती.

मला समजेना की
वृक्ष एकाएकी त्यांची सालं का उतरवू लागले

नदी का बाजूला करू लागली होती तिच्या देहावरचं पाणी
आणि फुलं का काढून ठेवू लागली त्यांच्या रंगांचे-वासांचे अलंकार
आकाश त्याचे
शालीन आणि उर्मट वारे उतरवून
समुद्रात ठेवणार
इतक्यात समुद्र सहजच भरतीनं उधाणले

अर्थापासून मुक्त
शब्द -
तत्त्व बनला होता
तितक्यात अक्षरभावानं तो
क्षणभरासाठी उजळला
आणि क्षणार्धात माझ्यात विलीन झाला.

■

303, शांतादुर्गा अपार्टमेंट
100 फुटी रोड, विश्रामबाग, सांगली 416 415
**भ्रमणभाष : 098506 22886**

मराठी माणसाची मूळ प्रवृत्ती ही 'चाकरमानी!' इमाने इतबारे चाकरी करून, प्रसंगी राजापेक्षाही राजनिष्ठ होण्यात मराठी माणसाला धन्यता वाटते ! (प्रत्यक्ष छत्रपती शिवरायांचे वडील मुघल दरबारात सरदार होते आणि पुढे पुण्याच्या शनिवार वाड्यावर 'युनियन जॅक' फडकवणारेही पेशवाईतील मराठीच होते!)

दुसरी मराठी प्रवृत्ती सीमोल्लंघन करून नवनवीन प्रदेशांत जाणे (ऐतिहासिक काळात राजकीय अर्थाने सध्याच्या काळात नोकरी, उद्योगधंदे) याबाबत मराठी माणूस दहा पावले मागे! इतिहासात एकदाच अटकेपार झेंडे लावल्याची घटना वाक्प्रचार बनते, यातच सगळे झाले! स्वत:च्या भाषेविषयीच न्यूनगंड असणे ही आणखी एक वाईट प्रवृत्ती, ज्यामुळे मराठी, महाराष्ट्रीय संस्कृतीच धोक्यात आलीय. जागतिकीकरणाच्या आणि संगणकीकरणाच्या रेट्यांत जगभरात जवळपास अडीच हजारांहून अधिक स्थानिक भाषा, बोली, लिपी नष्ट होण्याच्या मार्गावर असताना, आपण स्वत:हूनच मराठीच्या मर्तिकाची तयारी करतो आहोत!

– संजय पवार, दै० महाराष्ट्र टाइम्स, ९ मे ०६
प्रेषक : डॉ० मिलिंद मालशे

# सामाजिक भाषाविज्ञानातील संख्यात्मक संशोधन-पद्धती

**सोनल कुलकर्णी - जोशी**

**लेखाची रूपरेषा**

१. सामाजिक भाषाविज्ञान (सा०भा०वि०) या ज्ञानशाखेची व्याप्ती; सा०भा०वि० या संज्ञेचा स्थूल अर्थाने व मर्यादित अर्थाने वापर
२. संशोधनाची उद्दिष्टे, 'संशोधन प्रश्न', गृहीतके निश्चित करणे
३. समाजवर्गनिष्ठ भाषाभेदांच्या अभ्यासासाठी लागणारी सामग्री कशी गोळा करावी?
४. गोळा केलेल्या सामग्रीचे विश्लेषण कसे करावे?
५. भाषेतील परिवर्तनीय घटक आणि सामाजिक भेद यांच्या परस्परसंबंधातून कसे निष्कर्ष काढता येतात- संख्याशास्त्राची मदत

## १. सामाजिक भाषाविज्ञान (सा०भा०वि०) या ज्ञानशाखेची व्याप्ती; सा०भा०वि० या संज्ञेचा वापर

आपल्याला उपलब्ध असलेल्या सामाजिक भाषावैज्ञानिक संदर्भपुस्तकांमध्ये 'सामाजिक भाषाविज्ञान' हे शीर्षक कधी व्यापक अर्थाने तर कधी मर्यादित अर्थाने वापरलेले आपण पाहतो. समाज आणि भाषा यांच्या परस्परसंबंधाचे वेगवेगळे पैलू उलगडून दाखवणाऱ्या क्षेत्रांचा स्थूलपणाने सा०भा०वि० मध्ये समावेश होतो. उदा० संस्कृतिनिष्ठ भाषाभेदांचा अभ्यास, समाजवर्गनिष्ठ भाषाभेदांचा अभ्यास, भाषा संपर्क ते संहिता (म्हणजेच संदेशप्रबंध) विश्लेषण यांसारखी क्षेत्रे (आकृती १ पाहा.)




**आकृती १ : सा०भा०वि० या शीर्षकाखाली स्थूल अर्थाने समाविष्ट होणारी क्षेत्रे**



अनुक्रमणिका

वास्तविक या सर्व परस्परसंबंधित पण स्वतंत्र विद्याशाखा आहेत. यांपैकी प्रत्येक क्षेत्राची उद्दिष्टे वेगळी आहेत आणि परिणामत: यांतील प्रत्येक विद्याशाखेची अभ्यासपद्धती वेगळी आहे. यांतील काही पद्धती गुणात्मक आहेत तर काही संख्यात्मक. उदा० द्वैभाषिक किंवा बहुभाषिक समाजांमध्ये भाषांचा वापर कोण कोणाशी, कधी, कुठे, कशाबद्दल बोलत आहे यावरून कसा ठरतो - याच्या गुणात्मक अभ्यासासाठी एक आराखडा हाइम्स आणि गंपर्झ यांनी १९६४ मध्ये सुचवला होता. तसेच संभाषणाचे विश्लेषण, संहिता-विश्लेषण, संस्कृतिनिष्ठ भाषाभेदांचा अभ्यास या विद्याशाखांमधील संशोधन-पद्धती ही प्रामुख्याने गुणात्मक तत्त्वांवर आधारलेली आहे. सूक्ष्म अर्थाने सा०भा०वि० ही संज्ञा समाजवर्गनिष्ठ भाषाभेदांच्या अभ्यासासाठीच वापरली जाते. सदर लेखात समाजवर्गनिष्ठ भाषाभेदांचा अभ्यास केंद्रस्थानी ठेवून या क्षेत्रात उपलब्ध असलेल्या लबॉवप्रणीत संख्यात्मक संशोधनपद्धतीची आपण माहिती करून घेणार आहोत. (सा०भा० विज्ञानामधील या क्षेत्राला अर्बन डायलेक्टॉलॉजी किंवा व्हेरिएशनिझम या नावाने ओळखले जाते.)

या विषयाची संशोधनपद्धती प्रामुख्याने विलियम लबॉव या अमेरिकन संशोधकाने विकसित केलेल्या ‘परिवर्तनीय घटक’ (लिंग्विस्टिक व्हेरिएबल) या संकल्पनेवर आधारली आहे. परिवर्तनीय घटकातील भिन्न पर्यायांना ‘परिवर्तित पर्याय’ (व्हेरिअंट्स) असे म्हणतात. या पर्यायांचा निर्देशात्मक अर्थ (रेफरेन्शियल मीनिंग) बदलत नाही. उदा० ‘पानी’ असा उच्चार केला किंवा ‘पाणी’ असा, तरी एकाच पदार्थाचा बोध होतो. पण या विविध पर्यायांचा वापर समाजातील निरनिराळ्या स्तरांतील लोक औपचारिक/अनौपचारिक शैलीप्रमाणे कमी-जास्त प्रमाणात करत असतात. ‘परिवर्तनीय घटक’ या संकल्पनेचे महत्त्व असे की ती वापरून आपण परिवर्तित पर्यायांची वारंवारता (फ्रिक्वेन्सी ऑफ यूसेज) मोजून एकाच भौगोलिक क्षेत्रातील भाषावापराबद्दल संख्यात्मक विधाने करू शकतो (जे बोली भाषांच्या पारंपरिक अभ्यासात करणे शक्य नव्हते). अशा संख्यात्मक निरीक्षणांचा आधार घेऊन आपण त्या भाषेच्या बदलाची दिशा निश्चित करू शकतो.

आता आपण या संशोधनपद्धतीचा तपशील पाहू या. संशोधनातील महत्त्वाच्या टप्प्यांचे खाली वर्णन केले आहे. आठ-दहा वर्षांपूर्वी मी पुण्यातल्या १२ ते १४ या वयोगटातल्या मुला-मुलींच्या प्रमाण-मराठीच्या वापराचा अभ्यास केला होता. सदर लेखात संशोधनपद्धतीचे वर्णन करत असताना हा अभ्यास मार्गदर्शक म्हणून वापरला आहे. महत्त्वाचा पहिला टप्पा म्हणजे

संशोधनाची उद्दिष्टे निश्चित करणे व त्या अनुषंगाने 'संशोधन-प्रश्न', गृहीतके तयार करणे.

**२. संशोधनाची उद्दिष्टे, 'संशोधन प्रश्न', गृहीतके निश्चित करणे**

संशोधनात कशाचे नमुने गोळा करायचे, ते कसे आणि किती मोजायचे हे संशोधनाच्या उद्दिष्टांवर अवलंबून असते. संशोधन हाती घेण्यामागे अभ्यासकाचे स्वत:चे निरीक्षण, किंवा पूर्वीच्या संशोधकांनी मांडलेली निरीक्षणे असू शकतात. हीच निरीक्षणे शास्त्रीय पद्धतीने तपासून पाहण्यासाठी नवीन संशोधन हाती घेतले जाते. पुण्यातील शालेय मुला-मुलींचा अभ्यास करायचे ठरवले ते अशीच दोन निरीक्षणे तपासून पाहण्यासाठी :

१) प्रमाण भाषेतील मुलांची क्षमता आणि त्यांचे शालेय यश व एकूणच निरनिराळ्या सामाजिक घटकांमधल्या मुलांना येणारा शालेय अनुभव यांचा परस्परसंबंध आहे असे दिसून आले.

२) दुसरे निरीक्षण असे की भारतीय सा० भा० वैज्ञानिक अभ्यासांतून 'जात' आणि 'सामाजिक वर्ग' या दोन घटकांचा भाषिक बदलाशी नेमका संबंध काय आहे हे लक्षात येत नाही. यातील दुसऱ्या निरीक्षणाबद्दल थोडी पार्श्वभूमी खाली देत आहे.

१९५८मध्ये विलियम ब्राइट आणि इतर काही अमेरिकन अभ्यासकांनी भारतीय भाषांतील भेदांचा संबंध भारतातील जातीय उतरंडीशी जोडला व यातूनच 'जाती-बोली' ही संकल्पना जन्माला आली (पहा ब्राइट, १९६०). साधारण १९६९पर्यंत भारतीय भाषांच्या संशोधनात जात या एकाच घटकावर लक्ष केंद्रित राहिले. तथाकथित 'जाती बोली'चे अस्तित्व गृहीत धरून या बोलींचे वर्णनात्मक अभ्यास झाले. १९६९च्या पुढे मात्र अचानक हा ओघ बदललेला दिसतो. त्या काळातील काही प्रमुख समाजवैज्ञानिक व सा० भा० वैज्ञानिक जातीचा उल्लेखही न करता शिक्षण, वय यांचा भाषावापरावर काय परिणाम होतो याचा अभ्यास करू लागले. १९७०च्या दशकातले सामाजिक-राजकीय वातावरण लक्षात घेतले तर असे दिसून येते की या काळात जात आणि सामाजिक वर्ग यांवर वाद सुरू झाले. त्या काळात जातीचे अस्तित्वच नाकारून वर्गरहित, जातिविरहित समाजनिर्मितीकडे विचारवंतांचा कल होता. याचा परिणाम असा झाला की भारतातील शहरांमध्ये औद्योगिकीकरणामुळे निर्माण झालेल्या सामाजिक गतिक्षमतेचा (सोशल मोबिलिटी) भाषेवर कसा परिणाम झाला आहे, व्यक्तीच्या स्थिर/कायम असलेल्या जातीय स्तराचा आणि परिवर्तनशील असलेल्या आर्थिक - शैक्षणिक स्तराचा एकमेकांशी संबंध

काय आणि त्यांचा भाषावापरावर एकत्रित परिणाम कसा होतो याचा क्वचितच विचार केला गेला आहे. हे मराठीच्या संदर्भात तपासणे आवश्यक वाटले.

संशोधनाची उद्दिष्टे निश्चित झाल्यानंतर विशिष्ट प्रश्न तयार करावेत. उदा० (१) मुलाच्या वडिलांच्या आर्थिक स्थितीचा मुलाच्या प्रमाण भाषावापराशी काय संबंध आहे? (२) मुलाच्या आईच्या शिक्षणाचा मुलाच्या प्रमाण भाषावापराशी काय संबंध आहे? (३) मुलाच्या वडिलांच्या शिक्षणाचा मुलाच्या प्रमाण भाषावापराशी काय संबंध आहे? (४) मुलाच्या जातीचा त्याच्या प्रमाण भाषावापराशी काय संबंध आहे? इ०. यानंतर या प्रश्नांवर आधारलेली गृहीतके तयार केली. उदा० मुलाच्या जातीपेक्षा त्याच्या आई-वडिलांच्या आर्थिक स्तराचा प्रमाण भाषावापरावर जास्त परिणाम असेल, इ०. प्रत्यक्ष संशोधनाद्वारे ही गृहीतके चुकीची किंवा बरोबर सिद्ध होतील.

यापुढचा टप्पा म्हणजे भाषकांचे आणि भाषितांचे प्रातिनिधिक नमुने गोळा करणे.

## ३. समाजवर्गनिष्ठ भाषाभेदांच्या अभ्यासासाठी लागणारी सामग्री कशी गोळा करावी?

इथे आपण आधी भाषकांच्या आणि नंतर भाषा-सामग्रीच्या नमुना निवडीबद्दल माहिती घेऊ या.

### ३.१ नमुना-भाषकांची निवड कशी करावी?

लबॉवची संशोधनपद्धती मूलत: संख्यात्मक असल्यामुळे नमुना-भाषकांची निवड प्रातिनिधिक असणे महत्त्वाचे असते. या दृष्टीने रँडम सँपलिंग (पूर्वग्रहरहित नमुने गोळा करणे) ही पद्धत सर्वांत योग्य समजली जाते. इथे रँडम ही कल्पना भाषावैज्ञानिक नसून संख्याशास्त्रीय आहे. या पद्धतीत नमुना-भाषकांच्या निवडीमागे कुठलेही पूर्वग्रह नसतात - जसे की स्त्री अभ्यासकाने सोयीचे म्हणून स्त्री-भाषकांचीच निवड करणे किंवा आपल्याला परिचित अशा एकाच परिसरातील भाषक निवडणे इ० रँडम सँपलमध्ये दूरभाष-सूची, मतदार-यादी यांचा उपयोग होतो. पण ही पद्धत पूर्णपणे भरवशाची असेलच असे नाही. कारण भारतात तरी स्वत:चा टेलिफोन असणारे लोक मध्यम किंवा उच्च वर्गांमध्येच आढळून येतील व मतदार-यादीत केवळ १८ वर्षांवरील मतदारांचा समावेश असतो. समाजातील सर्व वर्गांचे, वयोगटांचे प्रतिनिधित्व या पद्धतीत होत नाही.

यावर उपाय म्हणून जजमेंट सँपल निवडण्याची पद्धत रूढ आहे. म्हणजे विशिष्ट समाजातील भाषावापराचे वर्णन करण्याच्या दृष्टीने त्या समाजातील

ठळक आर्थिक स्तर, जाती, लिंग, वयोगट इ०चा काळजीपूर्वक विचार करून त्या सर्वांचे प्रतिनिधित्व करतील असेच माहीतगार निवडणे. उदा० पुण्यातील शहरी मराठीचा सा०भा० वैज्ञानिक अभ्यास करायचा झाल्यास पुणे शहरातील ब्राह्मण-ब्राह्मणेतर, मध्यमवर्गीय व कामगारवर्गीय, स्त्री-पुरुष, लहान-तरुण-वयस्क, याप्रमाणे जात, वर्ग, लिंग, वयोगटांचे वेगवेगळे स्तर विचारात घ्यावे लागतील. त्यांची तालिका-पद्धतीने मांडणी करून प्रत्येक रकान्यात किमान ८ माहीतगार निवडावे लागतील (पाहा : मिलरॉय १९८७, पृ० २२).

जजमेंट सँपलचे एक उदाहरण आपण इथे विचारात घेऊ या : जात, लिंग, वय, आर्थिक स्तर हे सामाजिक वर्गीकरणाचे निकष मानल्यास आपल्याला खालीलप्रमाणे तालिका तयार करता येईल :

दोन जाती, दोन लिंगे (स्त्री, पुरुष), तीन वयोगट, (१८-३०, ३१-४५, ४६-६०) आर्थिक वर्ग (मध्यम, कामगार) (एकूण २४ रकाने किंवा cells) × (प्रत्येकी आठ माहीतगार) = एकूण १९२ माहीतगार. हीच माहिती खाली तालिकेच्या स्वरूपात मांडली आहे :

| जात १ | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | स्त्री | | | पुरुष | | |
| | १८-३० | ३१-४५ | ४६-६० | १८-३० | ३१-४५ | ४६-६० |
| मध्यमवर्ग | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ |
| कामगारवर्ग | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ |

| जात २ | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | स्त्री | | | पुरुष | | |
| | १८-३० | ३१-४५ | ४६-६० | १८-३० | ३१-४५ | ४६-६० |
| मध्यमवर्ग | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ |
| कामगारवर्ग | ८ | ८ | ८ | ८ | ८ | ८ |

**तालिका १ : जजमेंट सँपल**

ही पद्धत नेहमीच यशस्वी ठरते असे मात्र नाही. पुण्यातील शालेय मुलांच्या अभ्यासासाठी वेगवेगळ्या सामाजिक स्तरांतील मुलं-मुली मी माहीतगार म्हणून



अनुक्रमणिका

गोळा करत होते. हे करीत असताना अनुसूचित जातीतील उच्चशिक्षित आई-वडिलांची मुलं सापडणे मला अवघड गेले. नंतर लक्षात आले की या वर्गातील सामाजिक स्तरांतील आई-वडिलांचा कल आपल्या पाल्यांना मराठी माध्यमिक शाळांपेक्षा इंग्रजी माध्यमाच्या शाळांमध्ये किंवा कॉन्व्हेंट्समध्ये पाठवण्याकडे आहे. पण माझा अभ्यास तर मराठी शाळांपुरताच मर्यादित होता!

आपण रँडम आणि जजमेंट सँपलिंग या नमुना-भाषकांच्या निवडीच्या पद्धती - पाहिल्या. याशिवाय सा०भा० वैज्ञानिक अभ्यासात 'भाषकाच्या संपर्कजाळ्याचा' वापर करूनदेखील सामग्री गोळा केली जाते. या पद्धतीत 'सामाजिक वर्ग'सारखी अमूर्त संकल्पना न वापरता व्यक्तीच्या रोज संपर्कात येणाऱ्या लोकांमध्ये तिच्या नैसर्गिक भाषावापराचे नमुने आपण गोळा करू शकतो.

तर हे झाले माहीतगारांच्या निवडीबद्दल. आता **भाषेचे** नमुने गोळा करण्यासाठी ज्या पद्धतीचा अवलंब केला जातो त्यांच्याबद्दल थोडी माहिती घेऊ या.

### ३.२ भाषेचे नमुने कसे गोळा करावेत ?

या ठिकाणी आपण आधी भाषिक सामग्री गोळा करण्यासाठी कोणत्या पर्यायी पद्धती उपलब्ध आहेत ते पाहू या. त्यानंतर लबॉवने विकसित केलेल्या 'मुलाखत पद्धती'चा तपशील पाहू या.

आपल्या अभ्यासाचे स्वरूप, त्याच्या गरजा/मर्यादा लक्षात घेऊन अभ्यासक खालील पद्धतींपैकी एकीचा किंवा एकापेक्षा जास्त पद्धतींचा संयुक्तपणे वापर करतो.

**१) प्रश्नावली**

भाषकांच्या सामाजिक स्तराबद्दल माहिती मिळविण्यासाठी, भाषेसंबंधी माहीतगारांची मानसिकता जाणून घेण्यासाठी आणि प्रत्यक्ष भाषावापराबद्दल माहिती घेण्यासाठी प्रश्नावलींचा उपयोग केला जातो. या पद्धतीमध्ये प्रश्नावलीत विचारलेल्या प्रश्नांची उत्तरे भाषक स्वत: लिहितात किंवा ती ध्वनिमुद्रित करतात. या पद्धतीत माहीतगारांनी स्वत:च्या भाषावापराबद्दल केलेल्या अंदाजांवर अभ्यासक अवलंबून राहतो. हे अंदाज चुकीचेही असू शकतात. त्यामुळे सा०भा० वैज्ञानिक बऱ्याचदा प्रश्नावलीतील उत्तरे तपासून पाहण्यासाठी भाषकाच्या घरच्यांमध्ये किंवा मित्रपरिवारात सामील होऊन / मिसळून निरीक्षण करतो.

२) **औपचारिक मुलाखत**

आधी फारशी ओळख नसलेल्या भाषकाची पूर्वनिर्धारित प्रश्नसूचीच्या आधारे मुलाखत घेतली जाते. या पद्धतीत नैसर्गिक भाषावापराचे नमुने मिळणे अवघड असते. मुलाखत-पद्धतीतील ही उणीव भरून काढण्याच्या दृष्टीने भाषकाच्या 'लहानपणीच्या एखाद्या आठवणीचे वर्णन', 'स्वत:च्या एका अनुभवाचे कथन' किंवा 'अलीकडे बघितलेल्या एका चित्रपटाचे कथानक' अशा प्रश्नांचा प्रश्नावलीत समावेश केला जातो. यामुळे भाषक मुलाखतीचा तात्कालिक संदर्भ विसरून आपल्या नैसर्गिक शैलीत बोलू लागतो.

३) **सहभागी निरीक्षण** (पार्टिसिपंट ऑब्जर्व्हेशन)

औपचारिक मुलाखतीद्वारा नैसर्गिक भाषावापराचे नमुने मिळणे अवघड असते. पर्यायी पद्धत म्हणून भाषकांच्या संपर्कजाळ्यात आधी प्रवेश मिळवून, त्यातील सभासदांत मिसळून, एकरूप होऊन नंतर त्यांच्या भाषावापराचे निरीक्षण केले जाते. असा संपर्क साधण्यासाठी संशोधक 'मित्राचा मित्र' किंवा 'मैत्रिणीची मैत्रीण' म्हणून ओळखल्या जाणाऱ्या पद्धतीचा उपयोग करतात. याच संपर्कतंत्राचा उपयोग करून व्यक्तीच्या रोजच्या वापरातल्या भाषेचे नमुने मिळू शकतात.

४) **ध्वनिमुद्रण**

भाषकांच्या पूर्वसंमतीने त्यांचे घरच्यांशी, सहयोग्यांशी, मित्रांशी रोजच्या संपर्कात होणारे संभाषण ध्वनिमुद्रित करणे ही एक पर्यायी पद्धत आहे. असे करत असताना टेपरेकॉर्डर सहज दृष्टीस येणार नाही अशा ठिकाणी ठेवला जातो. या पद्धतीचा फायदा असा की या पद्धतीत नैसर्गिक भाषावापराचे नमुने मिळण्याची शक्यता सर्वाधिक असते. मात्र आपली वैयक्तिक संभाषणे ध्वनिमुद्रित करण्याची परवानगी सगळे देतीलच असे नाही. भाषकाचे बोलणे त्याच्या अजाणतेपणे ध्वनिमुद्रित करणे अनैतिक समजले जाते.

५) **दैनंदिनीचा वापर**

अभ्यासकाने दिलेला आराखडा वापरून अभ्यासासाठी निवडलेले भाषक आपल्या रोजच्या भाषावापरासंबंधी टीपा/नोंदी एका वहीत लिहून ठेवतात. अभ्यासाचा विषय द्वै-किंवा बहुभाषिकता असला तर अभ्यासक या पद्धतीचा वरील एखाद्या पद्धतीला पूरक म्हणून अवलंब करू शकतो. बहुभाषक किंवा घरच्यांशी, नातलगांशी, शेजाऱ्यांशी, सहकाऱ्यांशी बोलत असताना कोणत्या भाषेचा कसा वापर करत आहे हे अभ्यासक दैनंदिनीद्वारे जाणून घेऊ शकतो.

भाषावापराचे वर्णन करत असताना आपले भाषिक नमुने जितके नैसर्गिक तितके चांगले. हे मिळविण्यासाठी लबॉवने जी पद्धत विकसित केली तिला 'मुलाखत-पद्धत' असे म्हणतात. या पद्धतीत प्रत्येक माहीतगाराला पाच प्रकारच्या शैलींमध्ये भाषेचा विचार होईल असे प्रश्न विचारले जातात व उत्तरे ध्वनिमुद्रित केली जातात. (१९६०मध्ये टेपरेकॉर्डरच्या शोधाने भाषेच्या अभ्यासात क्रांती आणली - त्याशिवाय इतके सूक्ष्म विश्लेषण करणे शक्य झाले नसते.) सर्वप्रथम मोकळ्या गप्पा मारून त्या व्यक्तीच्या नैसर्गिक भाषावापराचा नमुना मिळवण्यावर भर असतो. अशा अनौपचारिक गप्पांकडून मुलाखत हळूहळू व्यक्तीचे लक्ष भाषेवर जास्त केंद्रित होईल अशा प्रश्नांकडे वळते.

| | | |
|---|---|---|
| अ. सहज<br>आ. काळजीपूर्वक | बोलण्याची शैली | अनौपचारिक |
| इ. पाठ्यवाचन<br>ई. यादीतील शब्दांचे वाचन<br>उ. लघुत्तमांतर युग्मांचे वाचन | वाचण्याची शैली | औपचारिक |

**आकृती २ : लबॉवची 'मुलाखत-पद्धत'**

नमुना-भाषकांना वाचायला दिलेल्या याद्यांमध्ये / पाठांमध्ये आपल्याला ज्या भाषिक घटकांचा अभ्यास करायचा आहे ते हुशारीने पेरावे लागतात.

पण प्रश्नोत्तरांचे स्वरूप आणि ही मुलाखत ध्वनिमुद्रित होत असल्यामुळे कितीही म्हटले तरी आपल्याला मुलाखत-पद्धत वापरून नैसर्गिक भाषा-नमुने मिळणे अवघड असते. यावर उपाय म्हणून सहभागी निरीक्षण ही पद्धत जास्त उपयोगी ठरते. दहा वर्षांपूर्वी पुण्यातील शाळांमधून विद्यार्थी-मित्र मिळवण्यासाठी मी या पद्धतीचा प्रयोग केला. सुरुवातीला वर्गशिक्षिकेने मुलांना माझा परिचय कॉलेजमध्ये शिकणारी एक 'ताई' असा करून दिला. हिला शाळेतील मुलांवर एक प्रकल्प पूर्ण करायचा आहे, त्यावर तिचे परीक्षेतले मार्क ठरणार आहेत, म्हणून मुलांनी या ताईला जितकी देता येईल तितकी माहिती द्यावी. त्यांच्यासारखीच पण त्यांच्यापेक्षा वयाने मोठी अशी विद्यार्थिनी म्हणून करून दिलेली ओळख मुलांशी अत्यंत अनौपचारिक असे नाते जोडण्यासाठी बरीच कामी आली. वर्गशिक्षिकेने माझ्याशी गप्पा मारायला म्हणून पहिल्यांदा चार विद्यार्थी पाठवले. या मुलांनी त्यांच्या इतर वर्गमित्रांबद्दल 'खोडकर', 'हुशार, 'सगळ्यांत भाग घेणारा' अशा वर्गीकरणातून बरीच माहिती दिली. आपल्या जवळच्या मित्राबरोबर माझ्याशी गप्पा मारायला येण्याचे आमंत्रण

कोणीच नाकारले नाही. समान वयोगटातील या विद्यार्थ्यांशी त्यांच्या आवडीच्या विषयांवर गप्पा मारता-मारताच मग माझ्या नमुना-चौकटीतील सर्व रकाने भरत गेले आणि जवळच्या मित्रांमध्ये ते वापरत असलेल्या भाषेचे नमुनेसुद्धा मिळाले.

**४. सा०भा० वैज्ञानिक सामग्रीचे विश्लेषण**

४.१ भाषेतील परिवर्तनीय घटक (व्हेरिएबल्ज)

ध्वनिमुद्रित केलेल्या संभाषणांचे, याद्यांचे प्रतिलेखन (transcription) केल्यानंतर त्यांतले परिवर्तनीय भाषिक घटक ओळखणे ही सा०भा० वैज्ञानिक विश्लेषणातील पहिली पायरी.

तत्त्वत: परिवर्तनीय घटक हे ध्वनिस्तरावर, पद आणि वाक्यस्तरावरही आढळतात. पण ते ध्वनि - आणि पदस्तरांवर जास्त प्रमाणात सापडतात. मराठीतील न/ण हा परिवर्तनीय घटक तर आपल्याला माहीत आहेच. त्याचप्रमाणे चहा-चा, दहा-दा, लहान-ल्हान-लान किंवा अर्थ-अर्त, काठी-काटी, आठ-आट, काढ-काड आणि पैसे-पैश्ये, मासे-माश्ये, विक्री-इक्री, ओटा-वटा असे बरेच पर्याय मराठीत सापडतात.

पदस्तरावर आला होता- आल्ता, (मी) करेन- (मी) करल, असे पर्याय दिसतात. पुण्यातील शालेय मुलांचा अभ्यास करत असताना आणखी एक लक्षणीय उदाहरण दिसून आले. एखादी कथा सांगत असताना किंवा दैनंदिन घटनांचे वर्णन करत असताना काही मुले साधा वर्तमानकाळ न वापरता भविष्यकाळाचा वापर करत -'तो हीरो एकदम शूर असणार. तो येणार आणि विलनला मारणार',.... किंवा 'तू दररोज संध्याकाळी काय करतोस' या प्रश्नाचे उत्तर देत असताना - 'घरी येणार, अभ्यास संपवणार आणि मग खेळायला जाणार' असे काही मुले बोलत. एकाच भाषेच्या बोलींचा अभ्यास करत असताना वाक्यस्तरावर त्यामानाने कमी पर्याय सापडतात. द्वैभाषकांमध्ये मात्र वाक्यस्तरावरही पर्याय सापडतात. उदा० मराठी-कन्नड द्वैभाषकांमध्ये मराठी बोलताना 'दादा म्हणाला (की) दहावी तरी पास हो' आणि 'दहावी तरी पास हो म्हणून दादा म्हणाला' या दोन्ही वाक्यरचना आढळतात. याचप्रमाणे भाषासंपर्कामुळे 'तेनं काम केलं', 'तो काम केला', आणि 'आमच्या मावशीनी काय केली' अशा पर्यायी वाक्यरचना सापडतात (पाहा कुलकर्णी-जोशी, २००७). निवडलेल्या प्रत्येक परिवर्तनीय घटकाचे एकूण किती नमुने गोळा करणे आवश्यक आहे, हा प्रश्न सा०भा० विज्ञानात वादाचा विषय आहे. साधारणपणे प्रत्येकी किमान तीस नमुने असावेत असे मत आहे. ध्वनिस्तरावर

याहीपेक्षा जास्त नमुने सहज मिळतात, पण पद- आणि वाक्यस्तरावरील परिवर्तनीय घटकांचे नमुने तुलनेने कमी सापडतात.

४.२ परिवर्तित पर्याय निश्चित केल्यानंतर पुढचा टप्पा म्हणजे त्यांची सामग्रीतील वारंवारता मोजणे

मराठीमधल्या 'मी करेन' आणि 'मी करल' (प्रथमपुरुष भविष्यकाळ) या एका परिवर्तनीय घटकाचे उदाहरण घेऊ या. एका नमुना-भाषकाकडून मिळालेल्या भाषा-सामग्रीमध्ये या घटकाचे एकूण ५० नमुने आढळले. त्यांपैकी -

/-एन/या पर्यायाचा वापर - ३५ वेळा

/-अल/ या पर्यायाचा वापर - १५ वेळा

तर /-एन/ या प्रमाण मराठीतील पर्यायाची वारंवारता (३५/५०) × १०० म्हणजे ७० टक्के इतकी आहे. याला लिंग्विस्टिक स्कोअर असे म्हणतात. अशा प्रकारे प्रत्येक नमुना-भाषकाचा प्रत्येक परिवर्तनीय घटकासाठी linguistic score काढला जातो. ठरावीक सामाजिक वर्गातील सर्व नमुना-भाषकांचे scores एकत्र केले जातात. कारण लबॉवच्या विचारसरणीनुसार सामाजिक वर्ग म्हणजे समान शिक्षण, आर्थिक परिस्थिती, राहणीमान व जीवनमूल्ये असणाऱ्या लोकांचा एक एकसंध समूह असतो. सा० भा० विज्ञानातील सुरुवातीच्या काळात ही पद्धत प्रचलित होती. अलीकडे पर्यायाने प्रत्येक भाषकाचा स्वतंत्र लिंग्विस्टिक स्कोअर मोजला जातो.

४.३ सामाजिक घटक

भाषकाची सामाजिक स्थिती (म्हणजेच त्याचे वय, लिंग, मूळ गाव, शिक्षण, शिक्षणाचे माध्यम, व्यवसाय, राहण्याचे ठिकाण इ०) आणि तसेच त्याच्या संपर्कजाळ्याबद्दल माहिती (जवळचे मित्र, कामाच्या ठिकाणचे सहकारी इ०) यांची माहिती एका वेगळ्या प्रश्नावलीद्वारे किंवा संभाषणाच्या ओघात मिळू शकते. अभ्यासक कधी आपल्या स्वतःच्या निरीक्षणाच्या आधारे तर कधी इतर संशोधनांच्या आधारे सामाजिक घटकांची निश्चिती करतो. या सामाजिक घटकांचेसुद्धा संख्यामापन केले जाते. उदा० 'वय' या घटकाचे 'अल्पवयीन', 'मध्यवयीन' आणि 'वृद्ध' असे गट करून त्यांचे अनुक्रमे १, २ व ३ असे संख्यामापन करता येते. तसेच 'शिक्षण' या घटकाचे 'अशिक्षित', 'दहावीपर्यंत', 'पदवीधारक', 'उच्चशिक्षित' असे गट करता येतील. (अधिक तपशिलांसाठी पाहा : चेंबर्स, १९९७, पृष्ठे ४१-४७). ज्या समाजांमध्ये आर्थिक परिस्थितीवर आधारलेले वर्गीकरण सापडत नाही. (उदा० ग्रामीण भागात), तिथे व्यक्तीचे संपर्कजाळे किती दृढ आहे, त्या समाजातल्या किती

लोकांशी तिचा किती प्रकारे संबंध आहे याचे संख्यामापन केले जाते. (अधिक तपशिलांसाठी पाहा : मिलरॉय, १९८०, पृष्ठ १४१)

अशा प्रकारे भाषेतील परिवर्तनीय घटकांचे आणि सामाजिक घटकांचे संख्यामापन केल्यानंतर त्यांचा एकमेकांशी संबंध संख्याशास्त्रीय पद्धतीने प्रस्थापित करता येतो. प्राथमिक विश्लेषणात समाजातील कोणता घटक भाषेतील कोणत्या पर्यायाचा किती वापर करतो, बोलण्याच्या विषयाचा, शैलीचा यावर कसा परिणाम होतो यांचे वर्णन करता येते. अलीकडे भाषेच्या वर्णनात्मक अभ्यासाचे ध्वनी, पद, वाक्य या स्तरांबरोबरच अशा प्रकारचे सा० भा० वैज्ञानिक वर्णन हे एक महत्त्वाचे अंग समजले जाते.

**५. भाषेतील परिवर्तनीय घटक आणि सामाजिक भेद यांच्या परस्पर-संबंधातून कसे निष्कर्ष काढता येतात - संख्याशास्त्राची मदत**

भाषेतील परिवर्तित पर्याय आणि सामाजिक घटक यांच्यातील परस्पर संबंध हा केवळ योगायोग नाही हे दाखवण्यासाठी संख्याशास्त्राची मदत घ्यावी लागते. मराठीच्या बोलींच्या अभ्यासासाठी या पद्धतीचा उपयोग सर्वप्रथम १९६२मध्ये महादेव आपटे यांनी मुंबईतील ब्राह्मणेतर मराठी भाषकांच्या अभ्यासासाठी केला. नंतर मॅक्सीन बर्न्सन यांनीही फलटणमध्ये ही पद्धत वापरली. ही पद्धत वापरून जगातील अनेक भाषांचा अभ्यास झाला आहे. त्यातून काही ठोस असे निष्कर्षही आपल्यासमोर आले आहेत. उदा०

१) शहरी समाजातल्या कोणत्याही एका सामाजिक गटातील पुरुषांपेक्षा त्यांतील स्त्रियांचा कल प्रमाण-भाषा जास्त प्रमाणात वापरण्याकडे असतो. ग्रामीण भागातल्या स्त्रियांमध्ये मात्र भाषाबदलाचे प्रमाण तुलनेने कमी असते.

२) कामगारवर्ग आणि उच्चवर्गीयांपेक्षा मध्यमवर्गीय लोक प्रमाण भाषा जास्त प्रमाणात वापरतात.

३) शहरी समाजातील संपर्कजाळी खुली म्हणजे कमी दृढ असल्यामुळे इथे भाषाबदलाचे प्रमाण आणि वेग जास्त असतात. त्यामानाने ग्रामीण भागात संपर्क-जाळी जास्त दृढ असतात; इथे भाषा बदलाचा वेग कमी असतो. म्हणजेच इथले सामाजिक वातावरण बोली भाषा टिकवून ठेवण्यासाठी पोषक असते.

सा०भा० वैज्ञानिक निरीक्षणांचा सगळ्यात मोठा उपयोग म्हणजे त्यांच्या आधारे भाषाबदलाची दिशा निश्चित करता येते. हे करत असतानादेखील संख्याशास्त्राची मदत होते. पुण्यातील शालेय मुलांच्या अभ्यासातून असे दिसून आले की या वयोगटातील भाषाभेदांचा सर्वाधिक संबंध त्यांच्या जातीशी

आणि आईच्या शैक्षणिक पातळीशी आहे. (परिशिष्टामधील तालिका पाहा). जात आणि वडिलांचा व्यवसाय (म्हणजेच कुटुंबाचा आर्थिक स्तर) यांचा एकत्रितपणेसुद्धा प्रमाण-भाषावापरावर परिणाम दिसून आला : ब्राह्मणेतर मुलांपैकी कामगार आणि मध्यम या दोन्ही वर्गांतील 'इतर मागासवर्गीय जाती' (खालील आलेखात 'बॅकवर्ड') या गटातल्या मुला-मुलींमध्ये प्रमाण मराठीचा सर्वाधिक वापर होत असल्याचे दिसून आले.




**समारोप**

भाषिक भेद आणि सामाजिक स्तरीकरण यांच्या परस्परसंबंधाच्या अभ्यासासाठी उपलब्ध असलेल्या संख्यात्मक साधनांची ओळख आपण सदर लेखात करून घेतली. लबॉवच्या १९६०च्या दशकातील संशोधनापासून या पद्धतीची सुरुवात झाली असली तरी त्यानंतरच्या पन्नास वर्षांमध्ये इतर संशोधकांच्या योगदानामुळे ही पद्धती विकसित होत-होत अधिक समृद्ध झाली आहे. संशोधनाच्या प्रत्येक टप्प्यावर अभ्यासकासमोर काही पर्याय असतात. संशोधनाची उद्दिष्टे लक्षात ठेवून यांतील योग्य पर्याय निवडायचा असतो. ही संख्यात्मक पद्धती वापरून भाषाबदलाची सुरुवात समाजातील कोणत्या वर्गात होत आहे हे लक्षात येऊ शकते. तसेच भाषाबदलाची दिशा आणि वेग यांची निश्चिती करता येते.

## संदर्भ

आपटे, महादेव. १९६२. 'लिंग्विस्टिक अकल्चरेशन अँड इट्स रिलेशन टु अर्बनायजेशन अँड सोशिओ-इकनॉमिक फॅक्टर्ज.' इंडियन लिंग्विस्टिक्स, २३ : ५-२५

कुलकर्णी, सोनल. २००१. सोशिओलिंग्विस्टिक वेरिएशन इन अर्बन इंडिया : अ स्टडी ऑफ मराठी स्पीकिंग ॲडलसंट्स इन पुणे. अप्रकाशित शोधप्रबंध, युनिव्हर्सिटी ऑफ रेडिंग, इंग्लंड.

कुलकर्णी-जोशी, सोनल. २००७-०८ 'रीव्हिजिटिंग कुपवाड : दि अर्गेटिव कंस्ट्रक्शन इन मराठी - द्रविडियन कॉन्टॅक्ट अँड कन्व्हर्जन्स.' बुलेटिन ऑफ द डेक्कन कॉलेज.

चेंबर्स, जॅक. १९९७. सोशिओलिंग्विस्टिक थिअरी. ब्लॅकवेल : ऑक्स्फोर्ड.

चेंबर्स, जॅक; पीटर ट्रडगिल; नॅटली शिलिंग-एस्टेस. (संपादक) २००४. अ हँडबुक ऑफ लँग्वेज व्हेअरिएशन अँड चेंज. ब्लॅकवेल : ऑक्सफोर्ड.

धोंगडे, रमेश. २००६. सामाजिक भाषाविज्ञान. दिलीपराज प्रकाशन, पुणे.

बर्न्सन, मॅक्सीन. १९७८. 'सोशल स्ट्रॅटिफिकेशन इन द मराठी स्पीच ऑफ फलटण'. इंडियन लिंग्विस्टिक्स : ३९:२३३-५१.

ब्राइट, विलियम. १९६०. 'अ केस स्टडी ऑफ कास्ट अँड डायलेक्ट इन मैसूर.' इंडियन लिंग्विस्टिक्स. २१:४५-५०

ब्राइट, विलियम; ए०के० रामानुजन १९६४. 'सोशिओलिंग्विस्टिक व्हेअरिएशन अँड लँग्वेज चेंज'. समाविष्ट जे०बी० प्राईड आणि जे० होम्ज् (संपादक). सोशिओलिंग्विस्टिक्स. पेंग्विन, मिडलसेक्स : इंग्लंड. पृ० १५७-१६६.

मालशे, मिलिंद. २००५. 'सामाजिक भाषाविज्ञानातील काही नव्या दिशा.....' समाविष्ट डॉ० जयश्री पाटणकर (संपादक) सामाजिक भाषाविज्ञान : कक्षा आणि अभ्यास ससंदर्भ प्रकाशन, नाशिक.

मिलरॉय, लेज्ली. १९८०. लँग्वेज अँड सोशल नेटवर्क्स. ब्लॅकवेल : ऑक्स्फोर्ड.

मिलरॉय, लेज्ली. १९८७. ऑब्झर्व्हिंग अँड ॲनलायझिंग नॅचरल लँग्वेज. ब्लॅकवेल : ऑक्स्फोर्ड.

लबॉव, विलियम. १९६६. द सोशल स्ट्रॅटिफिकेशन ऑफ इंग्लिश इन न्यू यॉर्क सिटी. सेंटर फॉर अप्लाईड लिंग्विस्टिक्स वॉशिंग्टन डी० सी०.

हाइम्स, डेल; जॉन गंपर्झ १९६४. (संपादक). 'दि एथ्नॉग्राफी ऑफ कम्युनिकेशन,' अमेरिकन ॲन्थ्रोपॉलॉजिस्ट. ६६, भाग २.

**परिशिष्ट**

पुण्यातील मराठीतील (न/ण) या परिवर्तनीय घटकांचे संख्याशास्त्रीय प्रतिदर्श (मॉडेल)

| Terms in model | Deviance | d.f. | F-ratio | p-value |
|---|---|---|---|---|
| constant | 6452.4975 | 113 | | |
| + जात | 5168.4986 | 110 | 12.09 | **<0.001** |
| + लिंग | 4917.6131 | 109 | 07.09 | **0.009** |
| + आईचे शिक्षण | 4478.8393 | 107 | 06.2 | **0.003** |
| + वडिलांचे शिक्षण | 4372.8539 | 105 | 01.5 | 0.2774 |
| + वडिलांचा व्यवसाय | 4279.8227 | 104 | 02.63 | 0.5852 |
| + जात × लिंग | 4100.402 | 101 | 01.69 | 0.2197 |
| + जात × आईचे शिक्षण | 3740.2251 | 95 | 01.70 | 0.2229 |
| + लिंग × आईचे शिक्षण | 3660.1190 | 93 | 01.13 | 0.3058 |
| + जात × वडिलांचा व्यवसाय | 3267.007 | 90 | 03.7 | **0.015** |
| + लिंग × वडिलांचा व्यवसाय | 3266.0893 | 89 | 0.03 | 0.8747 |
| + आईचे शिक्षण × वडिलांचा व्यवसाय | 3082.8759 | 87 | 2.59 | 0.0810 |

या तक्त्यात p-value म्हणजे सापडलेले परस्परसंबंध (correlation) किती दृढ आहेत याचे संख्याशास्त्रीय मोजमाप. परस्परसंबंध दाखवणारी ही संख्या ०.०५पेक्षा जितकी कमी तितका हा संबंध दृढ असतो. गोळा केलेल्या भाषा-सामग्रीतील न/ण या भेदांचा ज्या सामाजिक घटकांशी दृढ संबंध आहे ते अधोरेखित केले आहेत. या अभ्यासातून दिसून आले की जात आणि आर्थिक वर्ग यांचा एकत्रितपणे भाषावापरावर परिणाम होत आहे.

■

प्रपाठक, डेक्कन कॉलेज, पुणे.
भ्रमणभाष : 098904 44606
ई-मेल : sonalkulk@rediffmail.com

# मराठी क्रियापदांबाबत एक विचार

**उमाकांत कामत**

मराठी व्याकरणातील संयुक्त क्रियापदांबद्दलचा वाद सर्व अभ्यासकांना परिचित आहे. व्याकरणाचा केवळ रूपवादी/प्रत्ययवादी दृष्टीने विचार करणारे व्याकरणकार आख्यात प्रत्यय हाच क्रियापदाचा निकष मानतात. 'धातूला आख्यात प्रत्यय लागून बनते ते क्रियापद' अशी क्रियापदाची व्याख्या ते करतात. ही विचारधारा संस्कृत व्याकरणाच्या परंपरेतून आली आहे. पण मराठी भाषेत गेली दीड-दोन शतके संस्कृतपेक्षा वेगळ्या प्रकारच्या वाक्यरचना विकसित झाल्या आहेत. त्यामुळे क्रियापदांची घडणही संस्कृतमधील क्रियापदांहून भिन्न स्वरूपाची झाली आहे. 'क्रियापद' हा वाक्यातील सर्वांत महत्त्वाचा व 'चैतन्यशाली' शब्द असतो. तो विशिष्ट क्रियावाचक असतो, वाक्यार्थ पूर्ण करतो, तसेच क्रियेचा काळ, अर्थ आणि स्थिती या छटाही व्यक्त करतो; त्याबरोबरच, पुरुष, वचन व लिंग हे विकारही त्याला होतात. (याबद्दलचे सविस्तर विवेचन 'भाषा आणि जीवन' हिवाळा २००९ या अंकातील माझ्या लेखात (पृ०२१) आलेले आहे.)

१) क्रियापदाचे हे विविध स्वरूपाचे कार्य लक्षात घेऊन पुढील प्रकारच्या मराठीतील रूढ वाक्यरचनांचा विचार केल्यास, केवळ आख्यात प्रत्यय हा क्रियापदाचा निकष मानणारी विचारधारा कशी अयोग्य आहे हे सहज कळून येते. उदा. ''मी नेमाड्यांची कादंबरी वाचत आहे/वाचलेली आहे/वाचणार आहे/ वाचत बसलो आहे.'' या सर्व वाक्यांत मुख्य क्रिया 'वाचण्याची' आहे, हे उघड आहे. तरीही आख्यात प्रत्ययवादी दृष्टिकोनातून फक्त 'आहे' हेच क्रियापद ठरते. तसे मानल्यास, वाक्यातील मुख्य क्रियेचा बोधच होत नाही, अशी विसंगती निर्माण होते. त्यामुळे क्रियापदाची प्रत्ययवादी व्याख्या उपयुक्त ठरत नाही. क्रियापदात वाक्यातील अभिप्रेत क्रियेचा समावेश होण्यासाठी 'वाच' या धातूचे रूपही क्रियापदात अंतर्भूत करणे आवश्यक ठरते. त्यानुसार वरील प्रत्येक वाक्यात अधोरेखित केलेली दोन वा तीन पदे एकत्र करूनच बहुपदी वा अनेकपदी क्रियापद मराठी वाक्यरचनेच्या दृष्टीने अपरिहार्यत: मानावे लागते. या सर्व वाक्यांत क्रियापदाच्या कार्यांची दोन वा अधिक पदांत विभागणी झालेली स्पष्ट

दिसते. मुख्य क्रियावाचक धातूची 'वाचत/वाचलेली/वाचणार' ही धातुसाधित रूपे क्रियेची स्थिती व अर्थ व्यक्त करतात; तर वाक्यार्थ पूर्ण करण्यासाठी 'आह' या साहाय्यक धातूचे रूप योजलेले आढळते. चौथ्या वाक्यात, क्रिया दीर्घकाळ चालू आहे हा अर्थ व्यक्त करण्यासाठी 'बस' या आणखी एका साहाय्यक धातूचे रूप योजलेले आढळते. वक्त्याच्या/लेखकाच्या मनातील आशयानुसार ज्या भिन्न रचना मराठीत रूढ झाल्या आहेत त्यांचे हे स्पष्टीकरण आहे. क्रियेची वेगळी स्थिती वा अवस्था व्यक्त करण्यासाठी मुख्य क्रियावाचक धातूचे पूर्णार्थवाचक क्रियापद न वापरता कृदन्त वापरले जाते आणि वाक्यार्थ पूर्ण करण्यासाठी वेगळ्या साहाय्यक धातूची योजना केली जाते, असे वाक्यरचनांचे सामान्य स्वरूप सांगता येईल. अशा प्रकारच्या क्रियापदांना 'संयुक्त' क्रियापद म्हणण्यास काही व्याकरणकारांनी हरकत घेतली आहे; म्हणून त्यांनी 'बहुपदी' क्रियापद म्हणावे, असे दामले यांनीच सुचविले आहे. कर्ता आणि कर्म अनेकपदी असू शकते. (उदा० मुख्यमंत्री व उपमुख्यमंत्री दिल्लीला गेले.) तसेच क्रियापदही अनेकपदी मानण्यास वस्तुत: हरकत नसावी.

२) मराठीतील क्रियापदांबाबतचा दुसरा विवाद्य प्रकार संस्कृत वा इंग्लिश भाषेतील तदर्थक क्रियापदांशी तुलना केल्यामुळे निर्माण झालेला आहे. विशिष्ट क्रिया' व्यक्त करण्यासाठी या दोन भाषांत एकच शब्द/पद वापरले जाते; पण मराठीत त्याच क्रिया सांगण्यासाठी दोन शब्द/पदे वापरावी लागतात. उदा०

| **संस्कृत** | **इंग्लिश** | **मराठी** |
|---|---|---|
| प्लु | (to) jump | उडी मारणे |
| द्विष् | (to) hate | द्वेष करणे |
| अभिगम् | (to) attack | हल्ला करणे |
| विश्वस् | (to) believe | विश्वास ठेवणे |
| तड-ताड् | (to) beat | मार देणे |

या उदाहरणांवरून लक्षात येते की, अशा क्रिया सांगण्यासाठी मराठीत नाम + क्रियापद अशी योजना केली जाते. (प्रस्तुत उदाहरणांतील अधोरेखित शब्द नामे आहेत.) अशा वेळी नाम बाजूला काढल्यास खरी क्रिया कळत नाही आणि व्याकरणदृष्ट्या नाम आणि क्रियापद या वेगळ्याच शब्दजाती असल्यामुळे नामांचा समावेश क्रियापदांत करता येत नाही असा दुहेरी पेच निर्माण होतो. काही अर्थवादी व्याकरणकारांनी, 'उडी मारणे' हीच खरी क्रिया आहे हे लक्षात घेऊन, त्या शब्दप्रयोगाला संयुक्त क्रियापद मानावे, असे प्रतिपादन केले आहे; पण मराठीतील रूढ वाक्यरचनेत (उदा० माकडाने उडी



अनुक्रमणिका

मारली.) 'उडी' हे स्वतंत्र स्त्रीलिंगी नाम ठरते व त्यानुसार कर्मणी प्रयोग होतो. त्यामुळे 'उडी मारणे' हे संयुक्त क्रियापद मानता येत नाही. प्रस्तुत वाक्यात 'माकडाने' हा कर्ता 'उडी' हे कर्म आणि 'मारली' हे क्रियापद - असे स्पष्टीकरण द्यावे लागते. 'मारली' या क्रियापदाचा वाच्यार्थ येथे अभिप्रेत नसून निराळा लाक्षणिक अर्थ समजून घ्यावा लागतो. अशा प्रकारच्या वाक्यप्रयोगात नाम आणि क्रियापद यांचा एकत्रित अर्थ मिळून विशिष्ट क्रियेचा अर्थ तयार होतो. म्हणजे त्या क्रियेसाठी नेमका एक धातू मराठीत वापरता येत नाही. हा वस्तुत: मराठी भाषेचा दुबळेपणाच म्हटला पाहिजे.

ही बाब लक्षात घेऊन रूढ वाक्यप्रयोगांचे निरीक्षण केल्यास काही वेगळे नमुने आढळतात. उदा० 'प्रश्न विचारणे' (to question) याअर्थी एकधातू क्रियापद मराठीत रूढ नाही; पण 'उत्तर देणे' याअर्थी 'उत्तरणे' यापासून 'तो मला उत्तरला' 'मी त्यांना उत्तरलो' असे भूतकाळी वाक्यप्रयोग मात्र अलीकडे रूढ झालेले दिसतात. याप्रमाणे नमस्कारणे, विश्वासणे इ० क्रियांचा सकर्मक प्रयोग करता येईल काय? आता पुढील वाक्ये पाहा -

शेजाऱ्याने मला धमकी दिली - शेजाऱ्याने मला धमकावले
पत्नीने त्याला खूण केली - पत्नीने त्याला खुणावले
कोळी होडीचे वल्हे मारतो - कोळी होडी वल्हवितो
आई मुलाला रागे भरते - आई मुलाला रागावते
सचिनने चेंडूला जोराने फटका मारला - सचिनने चेंडू जोराने फटकावला
आजी नातवाचे लाड करते - आजी नातवाला लाडावते

या सर्व वाक्यांत (धमकी, खूण, वल्हे, फटका, लाड) या नामांना 'अव' किंवा 'आव' असा प्रत्यय लावून सकर्मक क्रियापदे बनविलेली दिसतात आणि अशा वाक्यरचना मराठीत रूढ झालेल्या आहेत. मग याच धर्तीवर पुढील प्रकारची क्रियापदे वापरता येतील काय?

| | |
|---|---|
| प्रश्न करणे - प्रश्नावणे | द्वेष करणे - द्वेषावणे |
| तुकडे करणे - तुकडवणे | प्रेम करणे - प्रेमावणे |
| उपकार करणे - उपकारवणे | मिंधे करणे - मिंधावणे |
| कृपा करणे - कृपावणे | फजिती करणे - फजितावणे |
| खंत करणे - खंतावणे | दया करणे - दयावणे |
| स्नेह करणे - स्नेहावणे | |

प्रस्तुत विचार मी चर्चेसाठी सर्वांसमोर ठेवीत आहे. भाषेतील वाक्यप्रयोग कृत्रिमरीत्या निर्माण होत नाहीत, याची जाण सर्वांना आहेच. तथापि काही

नामवंत लेखकांच्या विशिष्ट लेखनशैलीतून मराठीला वेगळे वळण लागल्याचेही अभ्यासकांनी नमूद केले आहे. तेव्हा आपण काही ठळक मंडळींनी विचारपूर्वक अशा क्रियापदांचा वापर सुरू केल्यास तो रूढ होऊ शकेलही.

काही विशेषणे व नामे यांना अशाच रीतीने अव/आव प्रत्यय लागून त्यांपासून तयार झालेली (अकर्मक) क्रियापदे मराठीत आजही रूढ झालेली आहेतच. उदा० थंड - थंडावणे, ओले- ओलावणे, रोड-रोडावणे, मंद-मंदावणे याचप्रमाणे उंचावणे, जडावणे, रुंदावणे, खालावणे इ० सर्व विशेषणसाधित धातू. त्याचप्रमाणे पाणी-पाणावणे, भार-भारावणे, पालवी-पालवणे, पस्तावा-पस्तावणे, सुख-सुखावणे, सांज-सांजावणे, आळस-आळसावणे इ० नामसाधित धातू.

यातून लक्षात येईल की, अव/आव प्रत्यय विशेषणांना/नामांना लावून क्रियापदे बनविण्याची प्रवृत्ती मराठीत रूढ झालेलीच आहे.तिचा उपयोग करून नामांपासून नवी सकर्मक क्रियापदे तयार करून, मराठीतील वाक्यरचनांना वेगळे वळण आपण देऊ शकतो काय, एवढाच प्रश्न आहे. (यावर चर्चा व्हावी) यातून संयुक्त क्रियापदांचा एक विवाद्य प्रकार कमी करता येईल.

■

102/4, एन, अशोक नगर, परांजपे मार्ग
वझिरा, बोरीवली (प०) मुंबई 400 092
भ्रमणभाष : 098214 25041

**पोटभाषा**

पोटभाषा उत्पन्न झाल्या म्हणजे मध्यवर्ती मातृभाषा कमकुवत होते असे नाही. पोटभाषा मातृभाषेचे सत्त्व न शोषता उलट तिला पोसण्याचे, तिच्या अंगावर मूठभर मांस चढविण्याचे काम करतात. पोटभाषा म्हणजे मूळ भाषेचे फाटे किंवा मूळ भाषाभागीरथीचे काही कालवे नव्हत की, त्यांमधून नदीचे पाणी खेळले गेले की, मूळ नदीला खांडवे पडावेत. पोटभाषा ह्या मूळ भाषारूपी अश्वत्थाच्या पारंब्या होत. त्यावरून खाली खोल अदृश्य जागेत जमिनीच्या थराथरांत चांगली जागा पकडून बसतात, व मूळ वृक्षास पोसण्याचे व वारा, पाऊस, तुफान वगैरे संकटांत बेगुमान अचल राहण्याची शक्ती त्यास देण्याचे कार्य करतात.

-कृ०पां० कुलकर्णी
*'मराठी भाषा - उद्गम व विकास' मधून*

# मराठी भाषेतील नकारात्मक वाक्यरचनेतील क्रियापदे

**धनंजय वैद्य**

मराठीमध्ये नकारात्मक वाक्यांत क्रियापदांची रूपे सकारात्मक वाक्यांपेक्षा वेगळी दिसतात. नकारात्मक वाक्यांतील क्रियापदांच्या रूपाबद्दल येथे मी वर्णनात्मक विवेचन करणार आहे.

मराठीमधील सकारात्मक वाक्यांमधील क्रियापदांची रूपे पंतव्याकरणातील प्रत्ययमाळांपासून चांगल्या प्रकारे वर्णिलेली आहेत. मराठीत क्रियापदाची कोणकोणती रूपे होतात, असा विचार करता 'काळ' कल्पना उपयोगी पडत नाही, तर रूपात्मक 'आख्याते' उपयोगी पडतात. काळ/अर्थ, लिंग, वचन आणि पुरुष हे आख्यातरूपाचे धर्म आहेत. अनेक व्याकरणकारांनी फेरफार करून मान्यता मिळवलेली व्यवस्था अशी:

**तक्ता १ : सकारात्मक वाक्यांतील आख्यातरूपे**

| क्रमांक | आख्यातवर्ग | अर्थ | अकर्मक उदाहरण | सकर्मक उदाहरण |
|---|---|---|---|---|
| १ | प्रथम त-आख्यात | वर्तमानकाळ | तो जातो | तू पोळ्या करतेस |
| २ | द्वितीय त-आख्यात | संकेतार्थ | जर तो जाता.... | जर तू पोळ्या करतेस.... |
| ३ | ल-आख्यात | भूतकाळ | तो गेला | तू पोळ्या केल्या(स) |
| ४ | व-आख्यात | विध्यर्थ | त्याने जावे | तू पोळ्या कराव्या(स) |
| ५ | ई-आख्यात | रीतिभूतकाळ | तो जाई | तू पोळ्या करीस |
| ६ | ऊ-आख्यात | आज्ञार्थ | तो जावो | तू पोळ्या कर |
| ७ | ईल-आख्यात | भविष्यकाळ | तो जाईल | तू पोळ्या करशील |
| ८ | च-आख्यात | कर्तरी रीतिभूत/भावे-कर्मणी विध्यर्थ | तो जायचा/ त्याने जायचे | तू पोळ्या करायचीस/ तू पोळ्या करायच्या(स) |

वरील सूचीमध्ये 'तू पोळ्या केल्या(स)' वगैरे, यातील (स) हा वैकल्पिक आहे. याला कर्ता-कर्म आणि कर्ता-भावे संकर प्रयोग म्हणतात. या लेखासाठी

त्या वैशिष्ट्याकडे दुर्लक्ष केले तरी चालेल.

* यात पुरुष हा एकच धर्म क्रियापदासाठी 'आख्यात'रूपात खास दिसतो. बाकी सर्व धर्म अन्य प्रकारच्या शब्दरूपांत कधीकधी दिसतात. पुरुष म्हणजे काय? मी/आम्ही, तू/तुम्ही, तो,ती,ते/ते,त्या,ती, म्हणजे बोलणारी, ऐकणारी, अन्य व्यक्ती यांच्या विवक्षेने शब्दाचे रूप बदलणे. अशा परिस्थितीत कधीच न बदलणारे रूप म्हणजे 'आख्यात' नव्हेच.

आता येथे या सर्व उदाहरणांची नकारात्मक वाक्ये बघू:

**तक्ता २ : नकारात्मक वाक्यांतील आख्यातरूपे**

| क्रमांक | आख्यातवर्ग | अर्थ | अकर्मक उदाहरण | सकर्मक उदाहरण. |
|---|---|---|---|---|
| १ | प्रथम त-आख्यात | वर्तमानकाळ | तो जात नाही/ नाही जात (सकारात्मक 'जातो') | तू पोळ्या करत नाहीस (सकारात्मक 'करतेस') |
| २ | द्वितीय त-आख्यात | संकेतार्थ | जर तो न/नाही जाता... (सकारात्मकाप्रमाणेच) | जर तू पोळ्या न/नाही करतीस... (सकारात्मकाप्रमाणेच) |
| ३ | ल-आख्यात | भूतकाळ | तो गेला नाही/नाही गेला (सकारात्मकाप्रमाणेच) | तू पोळ्या नाही केल्या(स)/केल्या नाहीस (सकारात्मकाप्रमाणेच) |
| ४ | व-आख्यात | विध्यर्थ | त्याने न जावे/जाऊ नये (सकारात्मकाप्रमाणे वैकल्पिक) | तू पोळ्या न कराव्या(स)/ करू नयेस (सकारात्मकाप्रमाणे वैकल्पिक) |
| ५ | ई-आख्यात | रीतिभूतकाळ | तो जात नसे (सकारात्मकात "जाई") | तू पोळ्या करत नसस (सकारात्मकात करीस) |
| ६ | ऊ-आख्यात | आज्ञार्थ | तो न जावो (सकारात्मकाप्रमाणेच) | तू पोळ्या करू नकोस. (सकारात्मक 'कर') |
| ७ | ईल-आख्यात | भविष्यकाळ | तो नाही जाईल/तो जाणार नाही (सकारात्मकाप्रमाणे वैकल्पिक) | तू पोळ्या नाही करशील/करणार नाहीस (सकारात्मकाप्रमाणेच वैकल्पिक) |
| ८ | च-आख्यात | कर्तरी रीतिभूत/ भावे-कर्मणी विध्यर्थ | तो नाही जायचा/ त्याने नाही जायचे (सकारात्मकाप्रमाणेच) | तू पोळ्या नाही करायचीस/ तू पोळ्या नाही करायच्या(स) (सकारात्मकाप्रमाणेच) |



अनुक्रमणिका

नकारात्मक वाक्यरचना असेल तर काही काही आख्यातांत क्रियापदरूप मराठीत दिसत नाही. अशा ठिकाणी सकारात्मकात ज्या धातूचे आख्यातरूप असते, नकारात्मकात त्या धातूचे कृदन्तरूप दिसते. नाही, नये, नको, वगैरे अशी आख्यातरूपे दिसतात. म्हणजे मराठीत न-असणे (न-अस्/आह् धातू) याची वेगळी अपूर्ण रूपावली मानणे जरुरीचे ठरेल. ही अस्/आह् धातूच्या रूपांशी थोडीफार समांतर आहे. नाही, नये, नको, वगैरे याची रूपे एका तक्त्यात देता येतील.*

नकारापुढे विशिष्ट आख्यात न दिसणे हा प्रकार अन्य भाषांतही दिसतो. संस्कृतात त्याची झलक दिसते.

कुरु/मा कार्षीः [म्हणजे कर/करू नकोस (पाणिनीची अष्टाध्यायी)]

इंग्रजीत हा प्रकार दिसतो, पण मूलतः वेगळा आहे:

is /is not ; was/was not; should /should not; does/does not....

या 'सहायक' (ऑक्झिलियरी) धातूंच्या सूचीतले जे धातू आहेत त्यांची रूपे सर्व आख्यातांत सकारात्मक आणि नकारात्मक वाक्यांत आढळतात. त्या सूचीवेगळे जे धातू आहेत, त्यांची आख्यातरूपे फक्त सकारात्मक वाक्यांतच दिसतात. नकारात्मक वाक्यांत do या सहायक धातूचीच आख्यातरूपे दिसतात:

goes/does not go; went/did not go (येस्पेर्सेन)

अरबी भाषेत असा प्रकार फार दिसतो की अर्थ जमवायचा असेल तर एका आख्याताचे नकारात्मक रूप दुसऱ्याच आख्यातात करावे लागते.

कतब/लम् तक्तुब् (लिहिले/नाही लिहिले) (राइट्विक्)

पण यात फरक हा, की ते वेगळे आख्यातरूप मूळ धातूचेच असते, मराठीत मात्र कुठल्याही आख्यातात मूळ सकारात्मक धातू जर नकारात्मकात बदलला, तर त्याचे कृदन्तरूप होते; आख्यातशब्द वेगळाच होतो.

समारोप : या विवेचनाला अनुसरून पुढील प्रस्ताव मराठी व्याकरणासाठी विचाराधीन व्हावा - मराठीत न-असणे (न-अस्/आह् धातू- नाही, नये, नको, वगैरे रूपे) याची वेगळी अपूर्ण रूपावली मानणे जरुरीचे ठरेल. ही अस्/आह् धातूच्या रूपांशी थोडीफार समांतर आहेत.

---

* नसणे (धातू नस्) हा वेगळा प्रकार आहे. त्याची सर्व आख्यातांत पूर्ण रूपे सापडतात. "नये" ची पुरातन व्युत्पत्ती "न येणे" पासून आहे. या गोष्टीचे आधुनिक मराठी व्याकरणाशी काही कर्तव्य नाही.



अनुक्रमणिका

## संदर्भ

**परब,** प्रकाश. २००२. मराठी व्याकरणाचा अभ्यास : ओरिएंट लॉंगमन, मुंबई.
**माङ्लुिड्।** पाणिनीय सूत्र ३.३.१७५ कशिकावृत्ती (१९८३ संस्करण) : चौखम्भा संस्कृत प्रकाशन, वाराणसी
Jespersen, O. 1933. Essentials of English Grammar. (Chapter 28 : Affirmation, Negation, Questions.) : Routledge, : New York, USA
Wrightwiok J.: Gaafar Mahmoud. 1998. Arabic Verbs and Essentials of Grammar : Passport Books, Chicago, USA

■

सहायक प्राध्यापक, जॉन्स हॉपकिन्स विद्यापीठ, बाल्टिमोर, यु०एस०ए०

शब्दांचा उच्चार व अर्थ ह्यात झालेल्या फरकानेच भाषेचा विकास होतो. शब्दांच्या स्वरूपात बदल, अर्थात बदल किंवा दोहोंत बदल, शब्दांचे स्वरूप कायम राहून अर्थ बदलणे किंवा अर्थ तोच राहून त्याच्या स्वरूपात फरक पडणे, जुने शब्द नाहीसे होणे, नवे शब्द येणे, हे सर्व प्रकार भाषेत प्रत्यही चाललेलेच असतात. असे पुष्कळ प्रकार झाले तरी भाषेस कमीपणा येत नाही. उलट हे प्रकार म्हणजे भाषेच्या जिवंतपणाची लक्षणे होत. जिवंत प्रण्यांमध्ये ज्याप्रमाणे बाल्य, तारुण्य, वार्धक्य अशी अवस्थान्तरे किंवा रूपान्तरे असतात, तद्वत् भाषेचीही ही रूपान्तरे होत. ह्या सर्व प्रकारांनी भाषा जास्त फोफावतच जाते. वर्णप्रक्रिया व अर्थप्रक्रिया ह्या दोन्ही प्रकारच्या चमत्कारांनी भाषेत हळूहळू फरक पडत जाऊन तिच्यापासून पोटभाषा व कालपरत्वे स्वतंत्र अशा भाषा उत्पन्न होतात.

- कृ०पां० कुलकर्णी
*'मराठी भाषा - उद्गम व विकास' मधून*

# धुळे जिल्ह्यातील दलित समाजाची बोली : अहिराणीचा सामाजिक भेद

**प्रकाश भामरे**

प्रत्येक समाजाची स्वत:ची अशी वेगळी बोली असते. त्या बोलीचा वर्णनात्मक पद्धतीने जसा अभ्यास करता येतो, तसा सामाजिक अंगानेही करता येतो. धुळे ग्रामीण परिसरातील दलित-महार जातीची बोली अहिराणी असली तरी तिच्यातील सामाजिक - सांस्कृतिक - धार्मिक घटकांच्या वेगळेपणामुळे त्या जातीच्या अहिराणी बोलीत लक्षणीय वेगळेपण निर्माण झालेले आढळते. हे वेगळेपण धर्मांतरापूर्वीच्या गावकुसाबाहेरील जगण्यातून व धर्मांतरानंतरच्या पाली भाषेच्या संपर्कातून आलेले आहे. म्हणून एकाच गावातील महार जातीतील लोक व महारेतर जातीतील लोक वेगवेगळी अहिराणी बोली बोलताना आढळतात. या वेगळेपणाला अहिराणी बोलीचा ठळक 'सामाजिक भेद' म्हणून नोंदविता येईल.

भाषा आणि संस्कृती यांचा परस्परसंबंध किती घनिष्ठ आहे हे सर्वश्रुत आहे. 'संस्कृतीचे व्यक्त रूप म्हणजे त्या समाजाची बोली होय'. (कालेलकर १९६४, पृष्ठ ५८) प्रत्येक समाजाची विशिष्ट संस्कृती असते, विशिष्ट सामाजिक प्रथा, परंपरा, लोकसंकेत, रीतिरिवाज असतात. विशिष्ट लोकधर्म असतो. त्यांतून त्याची बोली वेगळेपण धारण करीत असते. 'बारा कोसांवर भाषा बदलते' असे विधान जेव्हा केले जाते, तेव्हा त्यात 'भौगोलिकता' अधोरेखित होते; तसेच 'प्रत्येक समाजाची किंवा जातीची बोली वेगळी असते', असे जेव्हा आपण म्हणतो तेव्हा त्यात 'सामाजिकता' अनुस्यूत असते. म्हणून भाषेच्या वर्णनात्मक अभ्यासापेक्षा ही दिशा वेगळी ठरते.

हिंदू समाजाचा विचार केला तर प्रत्येक ठिकाणी 'जात' आणि 'व्यवसायसाम्य' यांवर आधारलेले अनेक वर्ग आपल्याला दिसतात. समान रूढी, चालीरीती त्याचप्रमाणे इतर अनेक बंधनांनी एकत्र सहजीवन जगावे लागत असल्यामुळे, एका जातीतील व्यक्तींना जी वैशिष्ट्ये प्राप्त होतात, त्यांतली काही भाषिक स्वरूपाची असतात. या संदर्भात ना०गो० कालेलकर (१९८२, पृष्ठ ५८) म्हणतात, ''जातिबाह्य प्रवृत्तींचा निषेध, प्रसंगी त्याविरुद्ध होणारे कडक इलाज आणि जातीच्या पंचांकडून होणारे नियमन, यांमुळे

जातिसंस्था संघटित आणि चिवट झाली. याचा परिणाम म्हणून इतर अनेक वैशिष्ट्यांप्रमाणे अंतर्गत विनिमयासाठी काही बाबतीत वापरला जाणारा 'शब्दसमूह' हे प्रत्येक जातीचे काही प्रमाणात वैशिष्ट्य ठरले.''

ही परिस्थिती आजही आहे. आज जातिनिष्ठ धंदा किंवा धंदानिष्ठ जात पूर्वीइतक्या चिवट स्वरूपात नसेल; पण तरीही एकच धंदा करणाऱ्या व्यक्तींना कार्यपरत्वे एकत्र येऊन विनियम करण्याची आवश्यकता कायमच आहे. भाषेचा हा विशिष्ट उपयोग त्या-त्या वर्गाच्या किंवा जातीच्या गरजेतून निर्माण झालेला आहे. मानवी प्रवृत्तींच्या प्रत्येक क्षेत्रात काही अंशी एका विशिष्ट प्रकारच्या अभिव्यक्तीची गरज असते; आणि त्या दृष्टीने भाषेला किंवा बोलीला वेगळे वळण देणे भाग असते. हा नियम समाजात सुरू होणाऱ्या नव्या प्रवृत्तींनाही लागू असतो. प्रवृत्तींचे क्षेत्र अधिक विस्तृत झाले किंवा समाजरचनेत काही परिवर्तन घडून आले, आणि त्याचा ठसा भाषेवर उमटला नाही, असे कधी होत नाही. दलित-महार समाजाचे धर्मांतर झाले. त्यानंतर बौद्ध धर्मातील आचारपद्धती या समाजाने काही प्रमाणात स्वीकारली. त्याचा परिणाम महार समाजाच्या बोली भाषेवर झालेला दिसून येतो. उदा० तथागत, भिक्खू, उपासक, आयुष्यमान, कालकथित, त्रिशरण, पंचशील, बुद्धवंदना, धम्मवंदना, संघवंदना, परित्राणपाठ, जयमंगल अष्टगाथा, जलदान विधी इत्यादी अनेक पाली वाङ्मयातील शब्द महार समाजाच्या बोली भाषेत रूढ झाले आहेत.

जातीच्या विशिष्ट प्रवृत्तींसाठी उपयोगात आणल्या जाणाऱ्या भाषेच्या रूपाला आपण त्या जातीची 'लोकबोली' म्हणतो. यातल्या काही प्रवृत्ती समान पातळीवर असतात; त्यामुळे ते शब्द तेवढे दुर्बोध वाटत नाहीत. परंतु काही गोष्टी त्या विशिष्ट जातीपुरत्याच सीमित असतात, म्हणून त्यांचे वाचक शब्द दुर्बोध वाटतात. उदा० पूर्वीच्या काळी महार जातीचा प्रमुख आहार 'गायीचे मांस' हा होता. पिढ्यानपिढ्या हा समाज गाय किंवा बैलाचे मांस खात आला आहे. जिवंत प्राण्याच्या मांसाला 'हलाल मांस' म्हणतात; तर मेलेल्या प्राण्याच्या मांसाला 'पड' असे म्हणतात. धुळे जिल्ह्यातील महार जातीच्या बोलीत गाय किंवा बैलाच्या मांसासाठी 'शाक' हा वैशिष्ट्यपूर्ण शब्द आढळतो. 'शाक' म्हणजे गुराचे मांसच; दुसरी भाजी नव्हे. 'शाक' संदर्भात विपुल शब्दसंपदा या बोलीत आढळते. त्या शब्दांचे अर्थ महारेतर जातींना कळत नाहीत, एवढे वेगळेपण त्यात आढळते. जसे - चाऱ्या, खांडऱ्या, खूर, डल्ल्या, चिच्चू, मुंड, पिंड, पार, डील, फफसे, कलेजा, चिलमट, चिचडा, नया, रगती, मांदं, इत्यादी आहारविषयक शब्दसंपत्ती आढळते.

समाजाच्या वेगवेगळ्या घटकांची ओळख करून घेणे, वेगवेगळ्या प्रदेशांत विखुरलेल्या समाजातील वर्गांची ओळख करून घेणे, म्हणजे त्यांच्या जीवनाचा, त्यांच्या सवयींचा अभ्यास करणे होय. अमुक ठिकाणचे, अमुक जातीचे, वर्गाचे लोक कसे वागतात, पोशाख कसा करतात, काय जेवतात, चरितार्थ कसा चालवतात, त्यांची कुटुंबपद्धती कशी आहे, त्यांच्या विवाहसंस्थेचे स्वरूप कसे आहे, त्यांचे सण-उत्सव, लोकदैवते कोणती आहेत, त्यांच्या नवस-सायासाच्या पद्धती, मर्तिक प्रथा इत्यादींबाबत ते कोणत्या रूढी पाळतात, हा अभ्यास पुष्कळ लोक करतात. परंतु संस्कृतीच्या या सर्व अंगांचे स्वरूप ज्यातून व्यक्त होते त्या अपरिहार्य माध्यमाचा, म्हणजे भाषेचा अभ्यास मात्र कोणी करत नाही. ज्यांना आपण मागासलेले समजतो, त्या व्यक्तींच्या तोंडी असणारी शब्दसंपत्ती, त्यांच्याविषयी उत्सुकता दाखवून जर आपण पाहिली तर नवल वाटल्याशिवाय राहणार नाही.

बोली आणि समाज यांतील परस्परसंबंध अतिशय घनिष्ठ असतात. त्यामुळे बोलणाऱ्या व्यक्तीच्या बोली भाषेतून त्याचा समाजच प्रकट होत असतो. समाजात अनेक कारणांमुळे वेगवेगळे स्तर निर्माण होतात. शिक्षण, व्यवसाय, जाति-जमाती, धर्म इत्यादी अनेक कारणांमुळे वेगवेगळे स्तर निर्माण होतात. या स्तरांची भाषापद्धती भिन्न-भिन्न असते. काही बाबतीत जाणवण्याइतपत वेगळेपण असते. एकाच गावातील किंवा परिसरातील बोली भाषा जाति-जमातींनुसार 'वेगळेपण' धारण करते. अशा प्रकारचे वेगळेपण धुळे परिसरातील महार जातीच्या अहिराणी बोलीच्या बाबतीत सोदाहरण सांगता येईल.

अहिराणी बोली ही खानदेशातील, त्यातल्या त्यात धुळे जिल्ह्याच्या ग्रामीण भागातील महत्त्वपूर्ण बोली आहे. या बोलीचे विभागानुसार अनेक भेद दृष्टीस पडतात. अहिराणी बोलीत विभागानुसार जसे 'प्रादेशिक भेद' निर्माण झाले आहेत तसेच जाति-जमातींनुसार 'सामाजिक भेद' निर्माण झालेले आहेत.

दलित जातींतील 'महार' ही एक वैशिष्ट्यपूर्ण जात आहे. या जातीची विशिष्ट अशी जीवनपद्धती होती व आहे. ही विशिष्ट जीवनपद्धती अस्पृश्यता, गावकुसाबाहेरचे जगणे यांतून निर्माण झाली आहे. त्याचप्रमाणे धर्मांतरातून बौद्ध जीवनपद्धतीच्या स्वीकारामुळे या जातीच्या धार्मिक, सामाजिक, सांस्कृतिक गोष्टी इतर जातींपेक्षा पूर्णत: वेगळ्या झाल्या आहेत. ह्या सामाजिक वास्तवाला व्यक्त करणारी त्यांची अहिराणी बोलीही वेगळी झाली आहे. हे 'वेगळेपण' अहिराणी बोलीचा एक ठळक 'सामाजिक भेद' म्हणून नोंदविता येईल.

धुळे जिल्ह्यातील महार जातीच्या अहिराणी बोलीत असे काही वैशिष्ट्यपूर्ण शब्द आहेत की, ते महारेतरांच्या अहिराणीत आढळत नाहीत. या शब्दांचा सामाजिक - सांस्कृतिक संदर्भ कळल्याशिवाय त्यांचा अर्थ इतरांना कळत नाही. उदा० आकडी. आठखोय, आवल्या, उचली नवरी, उडती तगारी, काठीघाट, काडीमोड, काढ्या, कासे, कोटम, खूर-मुंडी, गंदोरं, गावकाठी, गायकोयपी, गोर, घरघुशी, घोडनवरी, चलवादी, झाड, ठानं, ढसकन, ढासली, ढेगमेग, देरवट, नाईक, पड, पाचपाल्या, पार, पेवबूड, पोटखालना, फुनकं, बलुतं, बाबत्या, भन्दं, भाट, भादीमाय, महारखोय, महार-चावडी, महारवर, महारवाजा, महार-वाटा, महार-शेवडी, महारीन साडा, महाऱ्या, रंगटाकन, रनबल्या, रांडकुली, रायरंग, रूसकीन नवरी, लंगर, वायनं, शाक, शीवदाबन, शेनकुकू, सरवा, सांगावा, हातवाही इत्यादी शब्दांचे सामाजिक, सांस्कृतिक संदर्भ माहीत असल्याशिवाय त्यांचे अर्थ इतर समाजातील अहिराणी बोलणाऱ्या लोकांना कळणार नाहीत.

प्रत्येक जातीची विशिष्ट अशी सामाजिक व्यवस्था असते. धुळे जिल्ह्यातील महार जातीची एक समाजव्यवस्था आहे. या सामाजिक व्यवस्थेचे विवाहप्रथा, मर्तिक प्रथा, लोकदैवते, लोकधर्म, व्यवसाय, अन्नप्रकार, कपडे, सण-उत्सव इत्यादी घटक आहेत. या घटकांचे आकलन 'महार' जातीच्या बोलीतून होते. धुळे जिल्ह्यातील दलित-महार जातीची बोली म्हणजे वैशिष्ट्यपूर्ण शब्दांचे भांडार आहे. या शब्दांचे अर्थ याच परिसरातील इतर जातींतील लोकांना जसे कळत नाहीत, तसेच याच जातीतील परंतु दुसऱ्या परिसरातील लोकांनाही कळणार नाहीत, एवढे 'वेगळेपण' या बोलीतील शब्दांमध्ये आढळते.

काही विशिष्ट संबंधावर आधारित अशा शब्दांचा एखादा गट वेगळा करणे शक्य आहे. हे शब्द अनेकदा एखाद्या संकल्पनेशी संबद्ध असतात. अशा शब्दगटाला 'अर्थक्षेत्र' किंवा 'शब्दक्षेत्र' म्हणतात. अशी शब्दक्षेत्रे महार समाजाच्या बोलीतही आहेत. या शब्दक्षेत्रांमधील शब्दांचे अर्थ महारेतर जातीतील लोकांना कळणार नाहीत.

### कुटुंबपद्धती आणि बोलीतील शब्द

धुळे जिल्ह्यातील ग्रामीण महार कुटुंबामध्येही पितृसत्ताक पद्धती आहे. त्या अनुषंगाने कुटुंबसंस्थेशी निगडित वैशिष्ट्यपूर्ण शब्द दलित-महार जातीच्या बोलीत आढळतात. उदा० देरवट, पोटखालना, रांडमुंड, लोकसोयऱ्या, घरघुशी, दूदभाऊ, दूदबहीन, रांडम्या, रांडकुली, रनबल्या इत्यादी.



अनुक्रमणिका

**विवाहप्रथा आणि बोलीतील शब्द**

प्रत्येक प्रांताच्या, जातीच्या, धर्माच्या विवाहप्रथांमध्ये विविधता आढळते. ही विविधता त्या-त्या जातीची बोली भाषा प्रकट करताना आढळते. उदा० मांगनं, देखा-पान्थाना, येटायामाना, कुयभाऊ, कुयबहीन, दुजवर, गंदोरं, हायद्या, पहिलंघर, देरवट, पोटले बोल इत्यादी.

**अन्नप्रकार आणि बोलीतील शब्द**

पूर्वीच्या काळी दलित-महार जातीचा प्रमुख आहार गाय किंवा बैलांचे मांस हा होता. त्यातून विपुल शब्दसंपदा या बोलीत आढळते. उदा० शाक, चान्या, खांडन्या, खूर, पार, चिचडा, नया, रगती, दुबी, आयनी इत्यादी.

अशा प्रकारे घरे, कपडे, व्यवसाय, नवस-सायास, भगताचे विधी, लोकदैवते, सण-उत्सव, लोकधर्म इत्यादी संदर्भातील शब्दसंपत्ती महार समाजाच्या वापरात आहे. धर्मांतरातून, पाली भाषेतून शाब्दिक नवस्वीकृती महार जातीच्या बोलीत झालेली आढळते. तसेच धुळे ग्रामीण परिसरातील महार जातीच्या अहिराणी बोलीत व महारेतर जातींच्या अहिराणी बोलीत उच्चाराच्या पातळीवर व शब्दांच्या पातळीवर वेगळेपण नजरेत भरते. त्याची काही उदाहरणे पुढीलप्रमाणे सांगता येतील.

**उच्चार भेद :**

| महारी अहिराणी बोली | महारेतर अहिराणी बोली | प्रमाण मराठी |
|---|---|---|
| अवलुंग (ऊ) | अवलोंग (ओ) | आतापर्यंत |
| आठुय (य्) | आठून (न्) | इथून |
| आदय (अ) | आदोय (ओ) | आढळ |
| आयनं (य्) | आलनं (ल्) | अळणी |
| ईसमारी (आ) | ईसमरी (अ) | पाल |
| उतीगये (उ) | वतीगये (व) | ओतले |
| कवय (व) | कधय (ध) | कधी |
| कवाड (आ) | कावड (अ) | दरवाजा |
| कुदाई (आ) | कुदय (अ) | कुदळ |
| गवऱ्या (या) | गवरा (आ) | गोवऱ्या |
| झायेर (य) | झ़ावर (व) | गोधडी |
| रगत (अ) | रंगत (ङ्) | रक्त |
| बलायं (यं) | वलावं (वं) | बोलविले |

**शाब्दिक वेगळेपण:**

| महारी अहिराणी बोली | महारेतर अहिराणी बोली | प्रमाण मराठी |
|---|---|---|
| आथा - तथा | ईबाक-तिबाक | इकडे-तिकडे |
| उपट | थापड | चापट |
| कयक | पुरानं | काठी |
| कोन जागे | कोना आठे | कोणाकडे |
| गदक | उकय | उकळ |
| गिरमी | थाटी | थाळी |
| टाकं | बोखलं | कोनाडा |
| तई-रूसना | सी-वरला | पाटा-वरवंटा |
| नांदडं | संपूट | टाकी |
| पची | सटी | पाचवी |
| पांघुर | धोतीर | धोतर |
| पानशेंगा | मासा | मासे |
| पुऱ्या | पुरनपोया | पुरण-पोळ्या |
| बट्टं | सार | रसा |
| बनाद | धाबोई | चादर |
| बयतन | जयन | सरपन |
| बन्होई | पाव्हना | मेहूना |
| बा | धल्ला | वडील |
| बेसन | पिठलं | पिठले |
| भज्या | बोंडे | भजी |
| भाते | सोदनं | फडके |
| मईस | काजय | काजळ |
| मुवया | गुयन्या | गुळण्या |
| मुकला | सावटा | पुष्कळ |
| मोगरी | बडोनी | बडोनी |
| रांडमुंड | रांडोय | विधवा |
| रोटपाट | पोयपाट | पोळपाट |
| जोतरं | वट्टा | ओटा |
| शेरी | बोय | बोळ |
| सोटचा | पयकाठ्या | पळकाठी |

वरील उदाहरणांवरून आपल्या लक्षात येईल की, महार जातीची अहिराणी

बोली उच्चाराच्या आणि शब्दांच्या पातळीवर वेगळेपण प्रकट करते. एवढेच नव्हे तर महार जातीच्या बोलीत वाक्प्रयोग व म्हणींसुद्धा वेगळेपण प्रकट करताना आढळतात. [पाहा : प्रकाश भामरे - 'धुळे जिल्ह्यातील दलितांच्या लोकोक्ती...' **भाषा आणि जीवन** २६-४ (दिवाळी २००८) पृष्ठे ३१-३७] जसे- 'बाईना फुले बाईल, नि शाबासी मन्हा याहीले', 'रायरंग रातभर राजा नि सकायमा ऊठी पानी कोनी पाजा,' 'दुसरी ऊनी घरमा, पायली गयी गोरमा', 'धल्ला नवरा कया कुयले आसरा झाया', 'धल्ला नवरा सदीमे निजे, जुवान बायको रातभर खिजे', 'घरमा फुटेल बोयका नि मांगस दोन-दोन बायका', 'तुले माले सांगाले, भगतीन आनी घुमाले', 'नाईक भाऊले वाडा भ्याये, नि घरनी बाई बाहेर पये', 'महारनं आख्ख गाव, नि त्यातले नही कोठे ठाव', अशा शेकडो म्हणी महार समाजाच्याच अहिराणी बोलीत आढळतात. त्यांच्या समाजभाषावैज्ञानिक अभ्यासातून एक नवी बाजू पुढे येते. या म्हणींचा अभिधात्मक अर्थ केवळ महार व्यक्तीलाच कळू शकेल व अभिधात्मक अर्थ समजल्याशिवाय त्यांची लक्षणाही कळणार नाही.

म्हणींप्रमाणेच दलित-महार जातीच्या वाकूप्रयोगांना सामाजिक-सांस्कृतिक संदर्भ आढळतात. जसे - शीव दाबनी पडी, खोयमा टाकेल से, आकडी धरेल से, देरवट वायेल से, महार वर देनं पडीन, हातबाही देनी पडीन, न्हानी पूंजनी पडीन, लंगर तोडना पडीन, इत्यादी वाकूप्रयोगांच्या अभिधांना सामाजिक-सांस्कृतिक संदर्भ आहेत. हे वाक्प्रयोग लोकरूढी, लोकसंकेत, विवाहप्रथा वगैरेतून आलेले असल्यामुळे महार समाजाचे लोकजीवन समजल्याशिवाय त्यांचे अर्थ कळत नाहीत. लोकबोलीतला हा 'मौलिक ठेवा' नीट जतन करून पुढील पिढीच्या हवाली करणे त्या-त्या समाजाचे कर्तव्य ठरते.

## संदर्भ


**कालेलकर**, ना०गो० १९६४. **भाषा : इतिहास आणि भूगोल**. मौज प्रकाशन, मुंबई.

**कालेलकर**, ना०गो० १९८२. **भाषा आणि संस्कृती**. मौज प्रकाशन, मुंबई.

मुलाखती

लक्ष्मीबाई अर्जुन भामरे

तिरोनाबाई नवल पाटील मु०पो० कापडणे, ता०जि० धुळे.

किसन नथ्थू मोरे


■


28 अजिंठा, रघुवीरनगर, खोडाई माता रोड, नंदुरबार 425 412

मराठी विभागप्रमुख, जी०टी० पाटील महाविद्यालय, नंदुरबार

भ्रमणभाष : 098222 94255

# मराठीतील आघातांचे उच्चार व लेखन (उच्चारदर्शनासाठी नागरी लिपीची अपर्याप्तता)

दिवाकर मोहनी

आपल्या मराठीसाठी वापरण्यात येत असलेली लिपी ही नागरी किंवा देवनागरी ह्या नावाने ओळखली जाते. हिंदी, मराठी आणि नेपाळी ह्या तीन भारतीय भाषांनी पूर्वी संस्कृतच्या लेखनासाठी वापरली जाणारी लिपी जशीच्या तशी उचलली. मराठी भाषेसाठी ती आपण अंदाजे एक हजार वर्षांपासून वापरीत आहोत. तिचा स्वीकार करताना ती आपल्या भाषेच्या उच्चारांसाठी पुरी पडते की नाही हे पाहिले गेले नाही.

त्या वेळी व तसे पाहिल्यास मुद्रण सुरू होईपर्यंत केल्या गेलेल्या लेखनाचा उपयोग मोठ्याने वाचण्यासाठी होत असे. तेसुद्धा स्वत: लिहिलेले स्वत:च मोठ्याने वाचून दाखविण्यासाठी जास्त. वाचन हे बहुधा प्रकट होत असे. (आपली काही आडनावेसुद्धा त्याची साक्ष देतात : पाठक, पुराणिक, व्यास वगैरे). साक्षरतेचे प्रमाण अत्यल्प होते. पोस्ट ऑफिस नव्हते आणि ग्रंथांची सुरुवात 'श्रोते पुसती कोण ग्रंथ, काय बोलिलेंजी येथ' अशी होत होती.

लोक बोलून व ऐकून भाषा शिकत होते. वाचिक आणि लिखित असे दोन्ही संकेत स्वतंत्रपणे, म्हणजेच परस्परनिरपेक्षपणेदेखील अर्थबोध करून देण्यास समर्थ आहेत हे तेव्हा माहीत झालेले नव्हते. दृष्टिगम्य संकेतांचे स्वत:च श्राव्य संकेतांमध्ये रूपांतर करून (म्हणजे शब्दांचा मोठ्याने उच्चार करून) मग त्या श्राव्य संकेतांपासून म्हणजे ध्वनीपासून लोक अर्थग्रहण करीत होते. अर्थ समजून घेण्यासाठी ते स्वत:ला व इतरांना ऐकवीत होते. लहान मुले वाचावयाला शिकतात तेव्हा त्यांना मोठ्याने वाचावे लागते. मनातल्या मनात वाचून चालत नाही. म्हणजे अर्थग्रहण करता येत नाही. पूर्वीचे वाचक जुन्या पोथ्यांवरून स्वत: नकलून घेऊन मोठ्याने वाचत असत त्यामुळे स्वत: मोठ्याने वाचताना त्यांच्या लेखनात झालेल्या चुका त्यांना त्रास देत नसत. उच्चारसातत्य कायम राखता येत असे. लेखनातल्या ऱ्हस्वदीर्घांचे महत्त्व नसे. श्रोत्यांच्या कानांना नीट वाटेल (डोळ्यांना नव्हे) असे त्यांना उच्चारता येत असे. आपली हेमाडपंती मोडी अशाच हेतूने आजच्या शॉर्टहॅण्डसारखी वापरली जात होती. ती लिहिणाऱ्याच्या मनातले बहुतेक सारे संदर्भ ती वाचणाऱ्याला बहुधा माहीत असत.

आज मुद्रणविद्येच्या प्रसारामुळे कोणीएकाने लिहिलेले लाखो लोक

वाचतात. नवीन नवीन विषयच नव्हे तर भाषासुद्धा पुस्तकावरून शिकतात. त्यामुळे पूर्वी शब्दांचे जे उच्चार ऐकून माहीत होत होते ते आता नवसाक्षरांसाठी किंवा नवीन विषयांत पुस्तकांच्या माध्यमांतून प्रवेश करणाऱ्यांसाठी (त्यांच्या वाचनात अपरिचित शब्द येतात त्यामुळे) अक्षरांच्या साह्याने दाखविण्याची सोय करावी लागणार आहे; पण ही सोय, अर्थात केवळ उच्चार समजावून देण्यापुरती असावी, नित्य लेखनासाठी नको. त्याची कारणे पुढे येतील.

आजपर्यंत लिपिशुद्धीचे विचार, चारदोन अपवाद वगळता, आपल्या लिपीला मुद्रणसुकर बनविण्यासाठी आणि तिच्यातील 'जोडाक्षरांची' संख्या कमी करून तिला यंत्रारूढ करण्यासाठीच झालेले आहेत. आपले यथार्थ उच्चार दाखविण्यासाठी तिच्यात पुरेशा सुधारणा झाल्या नाहीत. केंद्र सरकारने पुरस्कारिलेल्या परिवर्धित देवनागरीमध्येसुद्धा याविषयी पुरेसा विचार झालेला नाही. नि:संदिग्ध अर्थ समजण्यासाठी लेखनात आणि उच्चारात सातत्य पाहिजे आणि तेवढ्यासाठीच लिप्यंतर नको.

संस्कृत आणि मराठी ह्या दोन अगदी वेगळ्या भाषा आहेत. त्यांमध्ये जननीजन्यभाव नाही असे माझे मत आहे. त्यांची प्रत्येकीची उच्चारप्रकृती वेगळी आहे. त्यामुळे मराठीचे काही उच्चार संस्कृतमध्ये नाहीत आणि संस्कृतचे मराठीत नाहीत. संस्कृतमधल्या स्वरांपैकी 'ऋ''ऌ' आणि अर्थात 'ॠ' 'ॡ' मराठीत नाहीत. व्यंजनांपैकी 'ञ' नाही. 'मी त्याला यूं यूं बनविले', ह्यामध्ये किंवा यंव्-त्यंव् ह्यामधले उच्चार ञ् किंवा ञो सारखे होतात पण त्याखेरीज ञ चा उच्चार मराठीत अन्यत्र कोठेही आढळला नाही. व्यंजनासारख्या संस्कृत शब्दांमधला ञ् आपल्याकडे न् सारखा उच्चारला जातो. मूर्धन्य ष चा उच्चार मराठीत नाही. ष हा वर्णच नाही म्हणून क्ष नाही. आपल्या ज्या शब्दांमध्ये क्ष हा वर्ण येतो तो शब्द आपण संस्कृतमधून घेतला आहे असे निश्चित समजावे.

संस्कृत नसलेले रिक्षा, बक्षी, नक्षी असे काही शब्द आम्ही वापरतो पण त्यांचे उच्चार रिक्शा, बक्शी असेच आहेत. आम्ही त्यांमधला क्ष हा वर्ण केवळ लेखनसौकर्यासाठी घेतला आहे. मराठीमध्ये ञ नाही म्हणून ज्ञ (ज्ञ) हा वर्णदेखील नाही. ज्ञ चा उच्चार आपण कोठे द्न्य सारखा तर कोठे निव्वळ ग्य सारखा करतो. इतकेच काय तर वँ हा उच्चारसुद्धा मूळ मराठीत कोठेही नाही. तसाच तो उत्तर भारतीय भाषांमध्येही नाही. सिंह, मांस, दंश, वंश, संस्कृत, हंस, संरक्षण, संशय ह्या सर्व शब्दांचा उच्चार करण्यास आम्हांला फार जास्त प्रयत्न करावा लागतो. तो उच्चार करावयाचा मराठी लोक संकोच करतात किंवा मांस, नपुंसक अशांसारख्या शब्दांमध्ये ते तो करीतच नाहीत. अन्यभाषी सिंहला सिंग किंवा सिन्हा, संवादाला सम्वाद असे करीत असतात. आपणही

नरसिंहाला हाक मारताना नरसिंग असेच करीत असतो. संयममध्ये सञ्यम सारखा उच्चार होतो पण हा शब्द किंवा 'किंवा' सारखी अव्यये हे सारे शब्द तत्सम म्हणजे संस्कृत आहेत. आपल्या भाषेत तत्सम शब्दांचा भरणा फार मोठा आहे. हे तत्सम शब्द संस्कृत, हिंदी, कानडी, तेलुगू, अरबी, फारसी, गुजराती आणि इंग्लिश ह्या भाषांमधून आलेले ज्ञात आहेत. ह्यांपैकी आपल्या उच्चारप्रकृतीचा परिणाम होऊन जे मुळापासून दूर गेले आहेत, त्यांना प्रतिपादनाच्या सोईसाठी तद्भव किंवा देश्य असे मानले आहे.

ह्या निबंधात मराठी किंवा मराठी भाषा हे शब्द जेथे जेथे पूर्वी वापरले आहेत किंवा पुढे वापरले जातील तेथे तेथे ते तत्समशब्दविरहित मराठीचे द्योतक आहेत असे मानावे आणि मराठी म्हणजे तद्भव किंवा देश्य शब्दांनीच बनलेली भाषा असे ह्या निबंधापुरते समजावे.

ह्यानंतर संस्कृत म्हणजे तत्सम शब्दांची उच्चारप्रकृती आणि मराठी म्हणजे तद्भव वा देश्यशब्दांमधून आढळणारी उच्चारप्रकृती ह्यांतील फरक अधिक विस्ताराने पाहू. यासाठी 'जोडाक्षरे' व अनुस्वार, तसेच रेफ (रफार) आणि विसर्गादी चिन्हे ह्यांचा विचार करावा लागेल.

संस्कृतमध्ये सर्व संयुक्ताक्षरांचे उच्चार आघातयुक्त होतात. त्याला अपवादच नाही. म्हणजे येथे छन्द:शास्त्रातील संज्ञा वापरावयाची तर अशा सर्व संयुक्ताक्षरांपूर्वी येणाऱ्या वर्णांचा उच्चार दोन मात्रांनी युक्त होऊन त्यांच्या ठिकाणी गुरुत्व येते. मराठीमध्ये मात्र ज्यांचा आघातयुक्त उच्चार होत नाही अशी जोडाक्षरे पुष्कळ आहेत. य ह्या वर्णाने युक्त, ह या वर्णाने युक्त आणि अनुनासिके. जे अनुस्वाराच्या योगाने दाखविले जाते त्याने युक्त असलेली बव्हंश जोडाक्षरे बहुधा निराघात जोडाक्षरे आहेत.

'य' ने किंवा खरे सांगावयाचे तर 'या' ने युक्त जोडाक्षरे फार जास्त आहेत. उद्या, मातक्यात्, म्यान, दरम्यान यांसारखे काही सुटे शब्द ह्या निराघात 'या' वर्णाने युक्त आहेत. पण मुख्य म्हणजे संबोधने : तात्या, बन्या, बग्या, बाळ्या, मन्या, पिल्या, बाब्या, मोळीविक्या, लाकूडतोड्या, हुजऱ्या, पाणक्या, पुतण्या अशा सर्व संबोधनांमध्ये व नामांमध्ये हा निराघात या येत असतो.

दुसरा फार मोठा वर्ग अनेकवचनांचा आहे. वाट्या, गाड्या, माड्या, होड्या, वाड्या, साड्या, बांगड्या, ताटल्या, पुऱ्या, सुऱ्या, दऱ्या, कादंबऱ्या इ०

आणखी एक मोठा वर्ग सामान्य रूपांचा आहे. त्याच्या, माझ्या, तुझ्या, पुण्याला, करण्यासाठी, आचाऱ्याला, त्याला, दिव्याखाली, खोऱ्याने वगैरे.

ह्या निराघात 'या' चा उच्चार फक्त मराठीत आहे. संस्कृतात नाही. आपण संस्कृतची लिपी घेतली. त्यामुळे विद्या, उद्यान, ह्यांमध्ये येणारा द्या आणि उद्या,

लाद्या, गाद्या ह्यांतला द्या ह्यांमध्ये आपण फरक करू शकलो नाही. संस्कृतामध्ये उद्या हा शब्दच नाही त्यामुळे त्याचा उच्चार दाखविण्याची त्यांनी सोय केली नाही. त्यामुळे ती मराठीतही आली नाही. पण मराठीला तिची गरज आहे.

उद्यासारख्या शब्दांमधल्या 'या' मुळे होणारे जोडाक्षर निराघात असल्यामुळे तेथले य हे व्यंजन केवलव्यंजन नसून तो अर्धस्वर आहे असे मी मानतो. ह्या अर्धस्वर य पासून जसा मराठीत या होतो तसे यी आणि ये सुद्धा होतात. उदा० गायी (गाई), सोयी (सोई), हुजऱ्ये, पाणक्ये, पुतण्ये, लाकूडतोड्ये, दात्ये, साठ्ये, परांजप्ये, मोत्यें, मी जात्ये, येत्ये वगैरे.

वर उल्लेखिलेल्या सर्व शब्दांमधील य चा उच्चार निराघात आणि त्यामुळे स्वरसदृश आहे. प्रमाण आणि नि:संदिग्ध उच्चारदर्शनासाठी हा स्वरसदृश उच्चार, मराठीत वेगळा दाखविणे, त्याची सोय करणे आवश्यक आहे.

'य' ह्या अर्धस्वरानंतर आपण आता व्यंजन ह आणि महाप्राण यांतील फरक लक्षात घेऊ. हा विचार मांडताना मी पुढे कदाचित चुकीची परिभाषा वापरीन, किंवा जुन्या पारिभाषिक शब्दांचा नवीन अर्थाने वापर करीन त्याकडे दुर्लक्ष करून आपण त्यातला विचार समजून घ्यावा.

कचटतप आणि गजडदब ह्यांपासून अनुक्रमे खछठथफ आणि घझढधभ होताना ते पहिले वर्ण महाप्राणयुक्त होतात असे मी पुढे म्हटले आहे. माझ्या मनातील कल्पना स्पष्ट होण्यासाठी ही व्यंजने अल्पप्राणाची महाप्राण झाली असे न म्हणता ती महाप्राणयुक्त झाली अशी भाषा मी वापरली आहे. त्यामुळे काहीसाठी माझे प्रतिपादन कदाचित दुर्बोध होईल.

मराठीमध्ये महाप्राण खछठथफ आणि घझढधभ ह्या वर्णांप्रमाणेच ण्ह न्ह म्ह य्ह ऱ्ह ल्ह व्ह ह्या वर्णांमध्येही येत असतो. संस्कृतात तो येथे कोठेही येत नाही. (मी निराघात य हा अर्धस्वर आणि निराघात ह ला महाप्राण असे मानतो. ह्यामधली णनम ही अनुनासिके तर यवरल हे अर्धस्वर आहेत हे ध्यानात घेण्याजोगे आहे. यवरल ह्या वर्णांचा उपयोग व्यंजनांसारखा आणि अर्धस्वरांसारखा असा दोनही प्रकारांनी होऊ शकतो. व्यंजनांसारखा केल्यास त्यांचा उच्चार आघातयुक्त तर अर्धस्वरासारखा केल्यास जोडाक्षरांमधला त्यांचा उच्चार निराघात होतो. त्यामुळे य्ह व्ह ऱ्ह ल्ह यामध्ये कोणतेच व्यंजन नाही, असे म्हणणे भाग आहे. अर्थात शब्दांमध्ये त्यांचा उच्चार निराघात होत असल्यास जेथे असा अर्धस्वर आणि महाप्राण ह्यांचा संयोग झाला आहे तेथे त्यांच्या ठिकाणचे पौर्वापर्य ठरविणे दुष्कर आहे. आजच्या लेखनामध्ये अडचण अशी की ही अक्षरे व्यंजने कधी असतात ते कळत नाही.

ण्ह- कण्हणे, न-न्हावी, उन्हाळा, पन्हे, पन्हाळा, तान्हुल्याला पाहून आईला पान्हा फुटला, म्ह-म्हशी, म्हातारा, म्हणून, आम्ही, य्ह-बय्हा (बावळट ह्या अर्थाचा नागपुरी शब्द) ऱ्ह-तऱ्हा, पऱ्हा, गोऱ्हा, ल्ह-कल्हई, कोल्हापूर, विल्हेवाट, वल्हवणे, वेल्हाळ, व्हा-जिव्हाळा, जिव्हारी, न्हावाशेव्हा, चव्हाण, पाव्हणा, देव्हारा इ० आता उच्चारलेल्या सर्व शब्दांमधला हा हे व्यंजन नसून तो महाप्राण आहे, असे मी मानतो ह्याचे कारण महाप्राणाचे लक्षण अर्धस्वराप्रमाणे निराघात उच्चार हे आहे असे मला वाटते. ह हे येथे व्यंजन असते तर त्याचा येथे साघात उच्चार करावा लागला असता. हा महाप्राण आपण व्यंजनासारखा लिहितो, हा आपल्या मराठी लेखनातला दोष आहे. आपण अशा दोषांसाठी रोमन आणि उर्दू या लिप्यांना हसतो, पण आपल्या मराठीच्या लेखनातला हा दोष अतिपरिचयामुळे आपल्याला त्रास देत नाही. तो पुरतेपणी आपल्या ध्यानातही आला नाही.

महाप्राण सगळीकडेच व्यंजनाप्रमाणे लिहिला तर काय होईल बघा. क मध्ये महाप्राण घातल्यावर तो क्ह असा होत नसतो तर ख असा होत असतो. अखण्ड ह्या शब्दाचा उच्चार ह हे व्यंजन वापरून केल्यास अक् हण्ड असा होईल, साघात होईल कारण दोन व्यंजनांचा उच्चार ती एकाच वर्णात आली असताना साघात करावयास हवा आणि त्याच नियमाप्रमाणे साघातमधील घा चा उच्चार साग्हात असा करावा लागेल. ह्या दोन उच्चारांवरून महाप्राण आणि व्यंजन ह ह्यांचा उच्चारांमध्ये कसा फरक आहे ते कळून येईल. पाहा (क-ख, ग-घ, च-छ, ज-झ, ट-ठ, ड-ढ, त-थ, द-ध, प-फ, ब-भ) का बनविली ते कळून येईल. आघातयुक्त उच्चाराबद्दलही काही गैरसमज आहेत. दिव्यातून आणि दिव्यांतून यामधील दुसऱ्या दिव्यामध्ये दोन व येतात असा काहींचा समज आहे. तेथे एकदाच व् आणि त्यानंतर दुसरे व्यंजन य हे आले असल्यामुळे त्याचा उच्चार आघातयुक्त होतो इतकेच.

'छ' ह्या अक्षराचा उच्चार मात्र वरच्या नियमाला अपवादात्मक आहे. ते महाप्राणयुक्त लिहिले जात असले तरी तेथे मुद्दाम आघात घ्यावा अशी संस्कृत भाषेची सूचना आहे. (मराठीची नाही.) त्यासाठी 'ह्रस्वस्य पिति कृति तुक्' असे सूत्र आहे. ह्या सूत्राप्रमाणे कोठल्याही ह्रस्व वर्णापुढे छ हा वर्ण आल्यास नियमाने आणि दीर्घ वर्ण आल्यास विकल्पाने तुगागम करावा, (तेथे एक जास्तीचा त् घालावा) असा नियम सांगितला आहे. उदा० वि+छेद = विच्छेद, परि+छेद = परिच्छेद, शब्द+छल = शब्दच्छल, मातृ+छाया = मातृच्छाया, पितृ+छत्र = पितृच्छत्र इ० एखाद्या दीर्घस्वरानंतर विकल्पाने तुगागम होत असल्यामुळे लक्ष्मीछाया आणि लक्ष्मीच्छाया अशी दोनही शुद्ध रूपे सिद्ध

होतात. नाहीतरी दीर्घ वर्णांच्या उच्चारानंतर आघाताची आवश्यकता कमी झालेली असते. आघात घेण्याचा हेतू उच्चारात त्या वर्णाच्या ठिकाणी गुरुत्व आणणे असा आहे. तो हेतू दीर्घत्वामुळे साध्य झालेलाच असतो. शिवाय च्छ आणि च्ह ह्यांच्या उच्चारांमध्येही सकृद्दर्शनी जाणविण्यासारखा भेद नाही.

मराठीमध्ये पडछायासारखे 'छ' चे निराघात उच्चार होत असतात. परिणामी मराठीत अन्नछत्र, पितृछत्र, मातृछाया, मुक्तछंद, नाट्यछटा, रंगछटा अशी संस्कृत शब्दांची (चुकीची) सामासिक रूपे रूढ झाली आहेत. उलट संस्कृत भाषेची जेथे शक्य असेल तेथे आघात घेण्याची प्रकृती असल्यामुळे तिच्यामध्ये उद्+हर = उद्धर, तस्मिन् + एव =तस्मिन्नेव्, इन्+अन्त = इन्नन्त असे संधी होत असतात. मराठीमध्ये एक+एक = एकैक असा संधी होत नाही तर एकेक असा उच्चार आपण करीत असतो.

खघछ ह्याविषयी सांगून झाले. ठथफझढधभ ह्या महाप्राणयुक्त अक्षरांबद्दल वेगळे सांगण्यासारखे काही नाही.

व्यंजन र् हा वर्णदेखील मराठीत नसल्यासारखाच आहे. र हा स्वरयुक्त (अजन्त-एकाच्) वर्ण मराठीत आहे. पण संस्कृतमध्ये (व्यंजन र्) पुष्कळ ठिकाणी वापरला जातो. तसा तो मराठीत आढळत नाही. व्यंजन र् चे चिन्ह संस्कृतात रेफ किंवा रफार ( ) हे आहे. ते ज्या शब्दांमध्ये आहे ते सर्व शब्द मराठीतर आहेत असे समजावे. ह्या रेफाने युक्त शब्द बघा : अर्क, मूर्ख, वर्ग, अर्घ, शार्ङ, अर्चा, जर्जर, निर्झर, अर्णव, आर्त, अर्थ, सूर्य, पूर्व, कीर्ती, मूर्ती असे असंख्य.

मराठीमध्ये सर्रास, हर्रास, किर्र, कोकर्डेकर, किर्लोस्कर, वगैरे शब्दांमधला रेफ व्यंजन र् चा द्योतक नसून निभृत र चा आहे. किरलोसकर (गावाचे मूळ नाव किरलोसी असे आहे.) कोकरडेकर (गावाचे नाव कोकरडा, स्थानिक उच्चार कोकल्डा असासुद्धा होतो.) असे हे मूळचे शब्द, शब्दांमधल्या काहींचे मधल्या किंवा शेवटच्या अक्षरांचे उच्चार निभृत करण्याच्या आपल्या पद्धतीप्रमाणे आणि उच्चारानुरूप केलेल्या लेखनामुळे किर्लोस्कर, कोकर्डेकर असे लिहिले जाऊ लागले.

सर्रास, हर्रास आणि किर्र ह्या शब्दांमध्ये मात्र व्यंजन र् चा उच्चार होतो असे मला वाटू लागले आहे. ह्या ठिकाणी ह्या शब्दांमुळे मराठीच्या उच्चारप्रकृतीचा आणखी एक विशेष आपल्या लक्षात येणार आहे. मराठीत किंबहुना सर्वच देश्य उत्तर भारतीय भाषांमध्ये जी आघातयुक्त जोडाक्षरे आहेत ती बहुधा ज्यांच्यामध्ये एकाच व्यंजनाचे द्वित्व झालेले आहे अशी आहेत. या नियमाला मला आतापर्यंत दोनचारच अपवाद दिसले आहेत. आधी नियम पाहू व मग

अपवाद.

नियम असा की मराठी शब्दांमध्ये असलेली जोडाक्षरे एकाच वर्णाचे द्वित्व होऊन होतात. उदा० कल्ला, किल्ला, गल्ला, हल्ला, हल्ली, गिल्ला, गिल्ली, दिल्ली, सल्ला, बल्ली, फल्ली, कच्चा, पक्का, खड्डा, जख्ख, मख्ख, चक्क, गच्ची, खच्ची, कच्चीबच्ची, लुच्चा, थुच्चा, सच्चा, झक्की, नक्की, चक्की, कित्ता, पत्ता, भत्ता, गुत्ता, ढिम्म, घुम्म, गप्प, मुद्दा, गुद्दा, हुद्दा, पट्टा, बट्टा, थट्टा, चिट्ठी, विट्टी, सुट्टी, पट्टी, बट्टी, चट्टी, भट्टी, खट्ट, घट्ट, गट्ट, मठ्ठ, लठ्ठ, आप्पा, बाप्पा, अण्णा, भय्या, अय्या, इश्श, वगैरे वगैरे.

अपवाद फक्त स्त, क्त ह्या वर्णांचा (गोष्ट हा शब्दसुद्धा गोठ असा उच्चारला जात असे) उदा० फस्त, मस्त, शिस्त, भिस्त, सुस्त, स्वस्त, जास्त, दुरुस्त, फक्त, मक्ता वगैरे.

आपण मराठीत ज्याला अनुस्वार म्हणतो ते पुष्कळ ठिकाणी नुसते बिन्दुचिन्ह असते. मराठीतल्यासारखा त्याचा गैरवापर अन्यत्र क्वचित झाला असेल. ते एकच चिन्ह. मराठीने संस्कृत भाषेतील अनुस्वार म्हणून ङ्ञ्ण्न्म् आणि वँ या अनुनासिक व्यंजनांच्या ऐवजी; अं, हं, सारख्या अनुनासिका उच्चारांसाठी; दोन सारख्या शब्दांमधला अर्थभेद स्पष्ट करण्यासाठी, नामांच्या ठिकाणी तृतीया, सप्तमी अशा विभक्तींचा, बहुवचनाचा, नपुंसकलिंगाचा आणि क्रियापदांच्या ठिकाणी अपूर्ण वर्तमानकाळाचा आणि प्रथमपुरुषी कर्त्याचा असे निर्देश करण्यासाठी इतकेच नव्हे तर खास मराठीचे जे उच्चार आहेत - झालं, केलं, गेलं इत्यादी, ते दाखविण्यासाठीही सरसहा वापरले आहे. त्यामुळे वाचकाची कोठे अर्थ समजण्याच्या बाबतीत सोय तर कोठे उच्चार करण्याच्या बाबतीत गैरसोय झाली आहे.

अनुच्चारित अनुस्वार हा वदतोव्याघात आहे. मराठीत आपण वापरतो ते वास्तविक बिन्दुचिन्ह आहे. म्हणून अनुस्वार व बिन्दुचिन्ह ह्यांच्या खुणा वेगळ्या असणे आवश्यक आहे. अनुच्चारित अनुस्वार म्हणून आपण संस्कृतची परिभाषा चुकीच्या अर्थाने वापरीत आहोत. 'सर्वांशी मिळून मिसळून राहा म्हणजे तू सर्वांशी यशस्वी होशील' ह्या वाक्यांतील दुसऱ्या सर्वांशी (सर्व अंशांनी) हा उच्चार मराठीत नाही आणि पहिला उच्चार संस्कृतात नाही.

अनुस्वार (बिन्दुचिन्हे नव्हे) आणि रफार ही दोनही व्यंजनचिन्हे आहेत. ही दोनच व्यंजने शिरोरेखेच्या वर येणारी व्यंजने होत. ज्या अक्षरांवर ती येतात ती अक्षरे त्यामुळे जोडाक्षरे मानली गेली पाहिजेत. रेफ हे चिन्ह नेहमीच अक्षरातील स्वरांशाला चिकटलेले असते आणि अनुस्वार तसा नसतो. त्यामुळे रेफ हा त्याच्या खाली लिहिलेल्या अक्षराच्या आधी उच्चारला जातो आणि न



अनुक्रमणिका

चिकटलेला अनुस्वार नंतर.

अनुस्वार आणि चंद्रबिंदू यांच्यातही फरक करणे भाग आहे. अनुस्वार हा अनुनासिक व्यंजनाचा आघातयुक्त उच्चार असून चंद्रबिंदू हा स्वरांना होणारा विकार आहे व त्यामुळे तो निराघात आहे. पण मग इंग्रजी शब्दांमधले अँड, बँक सारखे उच्चार दाखविण्यासाठी निराळी सोय करावी लागेल. आणि आपला चंद्रबिंदू कँवरसाहेब, हँ हँ आणि हँ हँ हँ (हं हं आणि हं हं हं हे श्री० दिनकर देशपांडे यांच्या एका नाटकाचे नाव आहे) अशा उच्चारांसाठी वापरला तर अँ साठीही वेगळे चिन्ह शोधावे लागेल.

**बिन्दुचिन्हांचे प्रकार**

१) खणखणीत अनुनासिक व्यंजन उदा० (क) शिंके, पंखा, गंगा, तंटाभांडण, भिंत, तिंबूनाना (येथे परसवर्णाप्रमाणे अनुस्वाराचा उच्चार होतो.)
ख) चिंच, मांजर, पंछी, पंजा (येथे परसवर्णाप्रमाणे उच्चार होत नाही कारण मराठीत ञ् आणि वँ नाहीत.)

२) अनेकवचनदर्शक : उदा० शब्दांमध्ये, लोकांसाठी, सर्वांपर्यंत

३) अनुनासिक स्वर उदा० अं, आं, इं, ईं, उं, ऊं, - अं, हं! वगैरे

४) झालं, केलं, गेलं असे उच्चार.

**अनुच्चारित (नवीन प्रमाण लेखन-नियमांनुसार हे अनुस्वार लिहिले जात नाहीत.)**

१) विभक्तिप्रत्यय - (मीं, तूं, आम्हीं) काळ (जातां, जातां) करूं - कर्ता (डोळ्यांनी बघतों, ध्वनी परिसतों कानीं, पदीं चालतों)

२) अर्थभेद - (नांव, कांच, पांच) - (क्रियापदें, आज्ञार्थी क्रियापदें, करीं, देईं)

३) लिंग - नपुंसकत्वाचा निर्देश (गुरुं, कुत्रीं, कार्टीं, कोकरूं, लेकरूं लिंबूं)

४) अव्यये - मुळें, साठीं, करितां

मराठीत पुष्कळशा अक्षरांचे उच्चार निभृत होत असतात. त्यांपैकी काही दाखविण्याचा तर काही न दाखविण्याचा प्रघात पडला आहे. दोन्ही, तिन्ही, चाऱ्ही मधील निभृत उच्चार व्यंजनांसारखे दाखविले आहेत. उदगीर, नागपूर, यांमध्ये तसे ते होत असले तरी ते दाखविण्याची पद्धत नाही.

संस्कृत भाषेसाठी वापरल्या जाणाऱ्या चिन्हांनी मराठीत निभृत उच्चार दाखवू नयेत. त्यासाठी वेगळी चिन्हे निर्माण करावीत. अर्थात हा विचार यथार्थोच्चार-दर्शनाबाबत आहे. नित्यलेखनासाठी नाही.

विसर्गाचा विचार केल्याखेरीज आघातविचार पूर्ण होत नाही. विसर्गाचा उच्चार मराठीच्या प्रकृतीला पूर्णपणे परका आहे. जोडाक्षरांच्या ठिकाणी फक्त

एकदाच कोठेतरी आघात घ्यावयाचा इतकेच मराठीला माहीत आहे. त्यामुळे विसर्ग व त्यापुढे 'जोडाक्षरे' असे एका शब्दात एकापुढे एक आले की विसर्गाचा लोप करून फक्त जोडाक्षराचा उच्चार करावयाचा अशी मराठीची प्रकृती आहे. नि:श्वास, नि:स्पृह, मन:स्वास्थ्य, मन:क्षोभ, यश:श्री अशांसारख्या शब्दांचे उच्चार निश्वास, निस्पृह, मनस्वास्थ्य, मनक्षोभ, यशश्री असे होतात. 'दु:ख'चा उच्चार, दुक्ख किंवा दुख्ख असा होतो. विसर्ग आणि जोडाक्षर एकापुढे एक आल्यामुळे एकाच शब्दामध्ये दोन आघात घ्यावे लागतात. पण आघात कमी घेण्याकडे मराठीचा कल असल्यामुळे आणि सरधोपट उच्चार करण्याची तिची प्रवृत्ती असल्यामुळे दोन आघातांचे उच्चार मराठीत कधीच होत नाहीत. उदा० उद्ध्वस्त, उद्द्योत, तज्ज्ञ, महत्त्व इ० महाप्राण, विसर्ग आणि व्यंजन 'ह' ह्यांमधील भेद मराठीला माहीत नसल्यामुळे अक्षरश: सारखे शब्द अक्षरशहाप्रमाणे धिक्कार, धि:कारप्रमाणे, अध:पात, अन्त:करण हे अधप्पात, अंतक्करणाप्रमाणे उच्चारले जातात व त्यामुळे ते तसे लिहिले जातात.

मराठीची उच्चारप्रकृती शक्यतो निराघात उच्चार करण्याची असल्यामुळे जेथे कोठे आघातामुळे गुरुत्व येते तेथे दीर्घत्वाची गरज नाही असे मराठी बोलणारे लोक समजतात. ह्या कारणामुळे प्राविण्य, नाविन्य, प्रित्यर्थ, धुम्रपान, रविन्द्र, दिक्षित, आशिर्वाद, तिर्थरूप, पुर्ण, पुर्व, सुर्य, किर्तन, जिर्णोद्धार, परिक्षा, अधिक्षक असे उच्चार करतात व तसेच लिहितात. मराठीमध्ये शब्दाच्या अन्त्यस्थानी 'अ' स्वर व उपान्त्यस्थानी 'इ' किंवा 'उ' असल्यास ते दीर्घ लिहावे असा नियम आहे. तद्भव शब्दांच्या बाबतीत मराठीची उच्चारप्रकृती लक्षात घेऊन, शिस्त, भिस्त, उंट, सुरुंग, तुरुंग, चिंच, भिंत असे शब्द वर सांगितलेल्या नियमाला अपवादस्वरूप मानावे असे सांगितले आहे. संस्कृत भाषेमध्ये स्वरांचे दीर्घत्व आणि आघात हे दोनही वेगवेगळे मानले गेल्यामुळे कीर्ती, तीर्थक्षेत्र, जीर्णोद्धार, आशीर्वाद, सूर्य, पूर्व, मूर्ख अशा सर्व शब्दांमध्ये दीर्घत्व कायम ठेवून आघात घेतला जातो.

काही सूचना - (कोशांमध्ये उच्चारदर्शनासाठीच वापरण्यासाठी; नेहमी लिहिण्यासाठी नाही.) रेफ किंवा रफार हे चिन्ह दर्या-दऱ्या, आचार्यांना-आचाऱ्यांना अशा उच्चारांतील फरक दाखविण्यासाठी आपण वापरीत असतो. ते तसेच वापरीत राहावे. अर्धस्वर दाखविण्याची सोय जर वेगळ्या पद्धतीने करता आली तर अर्धा ऱ् (꣹) त्या चिन्हाची गरज पडणार नाही, कारण ते सध्या निराघात व्यंजन ऱ् दाखविण्यासाठी वापरले जात आहे.

निराघात 'या' दाखविण्यासाठी विनोबांनी लोकनागरीमध्ये सुचविलेला ᚠ असा कान्या वापरण्यास काही हरकत नाही. त्यामुळे रजा आणि राज्य ह्या दोन शब्दांचे सामान्यरूप डोळ्यांस वेगळे दिसेल.

आपल्या लिपीतील एका स्वरयुक्त उच्चारासाठी एक अक्षर ही कल्पनाच मोठी मनोरम आहे. उद्ध्वस्तमधल्या द्ध्व मध्ये तीन व्यंजने व त्यांच्याबरोबर एक स्वर, धाष्ट्‌र्य मध्ये चार व्यंजनांच्या सोबत एक स्वर, कात्स्‌र्न्यमध्ये पाच व्यंजने - स्वराच्या आधी व एक नंतर अशा सहा व्यंजनांचे एक अक्षर आपण लिहितो. कमी अक्षरांमुळे नि:संदिग्धता येण्यास मदत होते. जलद वाचनास व अर्थग्रहणासही साह्य होते· हा आपल्या लिपीचा गुण नष्ट होऊ देऊ नये. आपल्या डोळ्यांना एकाच प्रकारच्या जोडाक्षरांची सवय व्हावी असे मी मानतो. एकच जोडाक्षर जर नेहमी वापरावयाचे तर ते पूर्वीपासूनचेच का नको असा मला प्रश्न पडतो. त्यासाठी एक आपद्ग्रस्त हा शब्द मी लिहून दाखवितो : 'आपद्ग्रसूत', 'आपद्ग्रस्‌त', 'आपद्ग्रस्त', 'आपद्ग्रसृत' - वगैरे. हे अनेक पर्याय डोळ्यांना त्रासदायक होतात म्हणून त्यांच्यापैकी एका रूपाचे प्रमाणीकरण करावे. छापताना सर्वत्र एकच प्रमाणित रूप वापरावे. थोडक्यात काय तर वाचकाची सोय लेखकाने आणि मुद्रकानेही पाहावी.

मराठीतले दंत्यतालव्य च, ज, झ, देहे दु:ख हे सूख मानीत जावे ह्यांतील ऱ्हस्व एकार, कोठे ऱ्हस्व ओकारही असेल, एका मात्रेपेक्षा कमी असलेले काही वर्णांचे अर्ध्या किंवा पाव मात्रेचे उच्चारही असतील. त्यांचा विचार पूर्वी पुष्कळांनी केला आहे. म्हणून मी तो येथे केलेला नाही. त्यातून हा निबंध मुख्यत: आघाताविषयी आहे. म्हणून येथे त्याचाच विस्तार केलेला आहे.

■

मोहनीभवन, धरमपेठ, नागपूर 440 010
भ्रमणभाष : 098819 00608

परकी संस्कृतीचा परिणाम प्रथमप्रथमच्या दिवसांत जो झाला त्याला धक्का दिला विष्णुशास्त्री चिपळोणकरांनी. सर्व इंग्रजी आमदानीत ह्या एकट्याच लेखकाने विचारांना चालना दिली व डोळ्यांवर आलेल्या झापडीतून सर्वांना हादरून सोडले. मराठी भाषेवर संस्कृतचा जो एक ठसा उठला, तो ह्याच लेखकाच्या लेखनाने विशेष उठला. ...पूर्वीची पेशवाईतील फारसीमिश्र जी मराठी भाषा होती ती १८५८पर्यंत. कोठेकोठे धुगधुगी होती... परंतु इंग्रजी आमदानीत जो संस्कृतचा पगडा तिच्यावर बसला तो अद्याप कायम आहे.

- कृ०पां० कुलकर्णी
*'मराठी भाषा - उद्गम व विकास' मधून*

# क्रियापदाचे बदलले स्थान

सलील वाघ

मराठी आहे एतद्देशीयांची भाषा. तिच्यात होत आहेत काही बदल, विशेष ठळक. काही गोष्टी जाणवतात. काही खुपतात. काही करतात संभ्रमित आणि विचारप्रवण. इंग्रजी भाषेच्या वाक्यरचनेत येते क्रियापद अगोदर. मराठीतही ते येत नाही असे नाही. ते येते, शक्यतो ललित साहित्यात किंवा अपवादात्मक परिस्थितीत. परंतु आता झाली आहे सर्वसाधारण परिस्थितीच अपवादात्मक! दूरदर्शनवर वाढली बातम्यांची चॅनेल्स. २००५ नंतर बनली परिस्थिती जास्त गंभीर. इंग्रजी माध्यमातून शिक्षण झालेल्या कामगारांचा होता त्यात जास्त भरणा. त्यांची बोली गेली लगेच उचलली. हिंदीवर लगेचच पडला त्याचा प्रभाव. मराठी भाषा म्हणून रेटा किंवां रोध शून्य. कारण मराठी माणूस एकतर (परक्यांसाठी) मनमिळाऊ. त्यातून बुद्धिवादी. शिवाय सहिष्णू. वर समाजकारण राजकारणात माहीर. मात्र भाषेबद्दल अव्वल अनास्था. प्रस्तुत लेखकाने केले एक अनौपचारिक सर्वेक्षण. यात निरीक्षली मराठीतली प्रमुख वृत्तपत्रे, दोन हजार पाच सालापासून. 'महाराष्ट्र टाइम्स,' 'लोकसत्ता', 'सकाळ', 'केसरी', 'लोकमत', 'पुढारी' ही वृत्तपत्रे आणि आजतक, स्टार, अल्फा, झी, आयबीएन, साम ही बातम्यांची चॅनेल्स, यांचे केले वाचन - आणि घेतली नोंद. त्यातून लक्षात आली ही बाब. मराठीवर पडतो आहे प्रभाव. शब्दक्रमासहित वाक्यरचनेचे केले जाते आहे अनुकरण. त्यामुळे क्रियापदाचे बदलले स्थान! ही नुसती नाही निव्वळ एक भाषाशास्त्रीय गोष्ट. याला आहे उद्याची अनेक मानवी परिमाणे. आज संस्कारक्षम वयात असलेली (४ ते १४) मराठी पिढी मोठी होणार आहे ऐकून हीच भाषा. आपण होत चाललो आहोत का जास्त जास्त ॲक्शन ओरिएंटेड? आपल्याला हवी 'क्रिया' अगोदर म्हणून येत आहे 'क्रियापद' अगोदर. याला नाही केवळ एक व्याकरणिक परिमाण. याचे संदर्भ आहेत अजून खोलवर. क्रिया म्हणजे ॲक्शन. ॲक्शन म्हणजे एक्साइटमेंट. समकालीन मराठीभाषकाचे सार्वजनिक जीवन झाले आहे सवंग. खाजगी जीवन झाले आहे खोखले. त्यामुळे ही दोन्हीकडची पोकळी भरून काढण्यासाठी त्याला काहीही करून हवी आहे एक्साइटमेंट. एक्साइटमेंटला वापरू इथे मराठी शब्द 'सनसनाटी'. मराठ्यांना हवी आहे सनसनाटी. म्हणून सरकले आहे क्रियापद आधी. ■

saleelwagh@gmail.com

# स्तिमित करणारा बौद्धिक आवाका

**सीताराम रायकर**

(परीक्षित पुस्तक : रुजुवात - अशोक रा० केळकर. लोकवाङ्मय गृह, मुंबई. २००८. पृष्ठे २४+३१६. किंमत रु. ६००/-)

डॉ० अशोक केळकर यांनी १९६४ ते २००५ या चाळीसहून अधिक वर्षांत साहित्य, संगीत, नाटक, नृत्य, शिल्प, वास्तुकला इ० कलांची मीमांसा करताना लिहिलेल्या लेखांचा संग्रह 'रुजुवात' च्या रूपाने मराठी वाचकांना उपलब्ध होत आहे. या संग्रहातील काही महत्त्वाचे लेख आतापर्यंत मराठीत प्रकाशित झालेले नव्हते. जे प्रसिद्ध झाले होते ते नियतकालिकांत किंवा ग्रंथांत विखुरलेले होते. डॉ० केळकरांचे हे लेख एकत्र करून छापल्यामुळे त्यांच्या विचार-व्यूहाची अधिक नेमकी ओळख करून घेणे जिज्ञासू वाचकाला आता शक्य झाले आहे.

डॉ० केळकरांची प्रज्ञा अनेक विद्याशाखांत अधिकारवाणीने संचार करताना दिसते. बहुतेकांना त्यांची ओळख एक श्रेष्ठ भाषावैज्ञानिक म्हणून असते. या क्षेत्रातील त्यांच्या कार्याला राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय पातळीवर मान्यता मिळालेली आहे. पण भाषाविज्ञानाच्या क्षेत्राबरोबरच इतर अनेक क्षेत्रांत त्यांनी अतिशय सूक्ष्मदर्शी, अंतर्दृष्टियुक्त लिखाण केले आहे. या विविध क्षेत्रांत त्यांनी केलेल्या कामगिरीच्या संदर्भात एक मार्मिक विधान प्रा० मे०पुं० रेगे यांनी केले आहे. ते या संग्रहाच्या 'भलावणीत' (ब्लर्ब) उद्धृत केलेले आहे. प्रा० रेगे म्हणतात, ''तत्त्वज्ञान, मानसशास्त्र, समाजशास्त्र, जीवशास्त्र, सांस्कृतिक इतिहास इत्यादी अनेक विद्याशाखांत ज्याची पाळेमुळे विस्तारलेली आहेत अशा भाषाशास्त्राचे (डॉ० अशोक केळकर) अधिकारी पंडित (आहेत). डॉ० केळकरांच्या ''मिस्टिकल अनुभवाकडे पाहण्याची नवी दृष्टी'' देणाऱ्या लेखाच्या संदर्भात प्रा० रेगे यांनी हे विधान केले. हे लेखन नंतर 'भेदविलोपन' या पुस्तिकेद्वारे वाचकांना उपलब्ध झाले. ते साहित्य-समीक्षक आहेत, साहित्य मीमांसक आहेत, त्यांना संगीतमीमांसक (म्यूझिकॉलॉजिस्ट) म्हणून संबोधिता येईल अशा प्रकारचे त्यांचे संगीतविषयक चिंतन आहे. नृत्य, शिल्प, वास्तुकला अशा

कलाप्रकारांवर त्यांनी त्यांच्या तलस्पर्शी, सूक्ष्मदर्शी आणि अंतर्दृष्टियुक्त चिंतनाने वाचकाला त्या-त्या कलांच्या स्वरूपाबद्दल नव्याने विचार करायला लावील अशा प्रकारचे लिखाण केलेले आहे.

युरोपियन इतिहासामधील विद्यांच्या पुनरुज्जीवनाच्या (रिनॅसन्सच्या) काळात अशी अनेक व्यक्तिमत्त्वे होती, ज्यांना आदराने 'रिनॅसन्समॅन' म्हटले जाई. मानव्य विद्यांच्या अनेक शाखांतील त्यांचा अधिकार सर्वमान्य असे. डॉ० केळकरांकडे पाहिले की ते आपल्या काळातील 'रिनॅसन्समॅन'च आहेत असेच त्यांच्याबद्दल म्हणावेसे वाटते.

डॉ० केळकर स्वत: उत्तम शिक्षक होते आणि शिक्षणप्रक्रियेतही त्यांना विशेष रस होता. प्रस्तुत संग्रहामध्येही 'शिक्षणाचे एक माध्यम - कला', 'अध्यापन आणि कवितेचे अध्यापन' या लेखांतून किंवा व्यावहारिक समीक्षा या चौथ्या विभागातील 'उपरी भाषा आणि थलकरी भाषा : लक्ष्मण माने यांच्या 'उपरा'च्या संदर्भात' या लेखाच्या इतिकथनात जे संदर्भ दिलेले आहेत ते ध्यानात घेतले तरी त्यांची शिक्षकाची भूमिका कळून येते. असेही म्हणता येईल की या ग्रंथातील अनेक लेखांत डॉ० केळकर अतिशय सूक्ष्म, तरल अशा प्रकारचे विश्लेषण करीत असतानाच अनेक प्रश्न उपस्थित करतात. तेव्हाही विद्यार्थ्यांना नव्या दिशांनी विचार करायला लावणाऱ्या शिक्षकाचे ते प्रश्न आहेत असेच जाणवते.

या ग्रंथामध्ये संग्रहित केलेल्या लेखांचे वर्गीकरण डॉ० केळकर यांनी चार विभागांत केले आहे. पहिला विभाग सैद्धांतिक समीक्षेचा आहे. यामध्ये डॉ० केळकर यांनी कविता ('कवितेचे असतेपण' - १९६९), 'कवितेचे सांगतेपण, करतेपण' (१९८३), 'शैली आणि तंत्र' (१९८५), 'भाषा आणि साहित्य' (१९७०,८१) 'कलावती वाणी : बोलणे, म्हणणे, गाणे' (१९९६) हे साहित्यविषयक लेख आहेत. त्याचप्रमाणे नाटक या विषयावर 'नाट्यकर्म आणि व्यक्तिमत्त्व विकास' (१९९६) आणि 'नाटक : एक होणे' (१९८७). याचबरोबर संगीत आणि नृत्य यांवरही दोन लेख आहेत. यांपैकी 'कवितेचे असतेपण' हा विशेष महत्त्वाचा लेख आहे. कवितेच्या असतेपणाचा प्रश्न चार प्रश्नमालिकांत दडलेला आहे, असे डॉ० केळकर मानतात. या चार प्रश्नमालिका
१) स्वत्वाचा प्रश्न २) अस्तित्वाचा, अस्तित्वकक्षेचा प्रश्न
३) धर्मित्वाचा प्रश्न ४) अर्थवत्तेचा किंवा तार्किकतेचा प्रश्न
अशा आहेत. या चार प्रश्नमालिकांची सविस्तर मांडणी डॉ० केळकरांनी त्यांच्या नेहमीच्या पद्धतीने काटेकोर चिकित्सकपणे केलेली आहे. डॉ० केळकरांच्या

विवेचनशैलीच्या वैशिष्ट्यांसह अशा प्रश्नांच्या विवेचनात नेहमी वापरल्या जाणाऱ्या शब्दांचा (संज्ञांचा) वापर चुकीचा आहे हे सांगत असतानाच ते काही धोक्याचे कंदीलही दाखवतात. उदा० कोणत्याच विशिष्ट कवितेचा विचार करायचा नाही. काव्य हा शब्द वर्ज्य. कारण तो 'गोलाकार'. या संग्रहातील बऱ्याच लेखांत डॉ० केळकर अतिशय सूक्ष्मात जाऊन चिकित्सा करतात आणि योग्य अन्वर्थक शब्द मिळाल्यानंतरच त्यांचे विश्लेषण थांबते. हा काथ्याकूट नाही, तर ॲरिस्टॉटलच्या वचनाप्रमाणे 'अचूक व्याख्या करणे हे बुद्धिमान व्यक्तीचे लक्षण आहे', या विधानाची साक्ष पटविणारे आहे. या लेखातील विश्लेषणातून कवितेच्या व्याख्येकडे ते वाचकाला आणतात. कविता म्हणजे १) संहिता २) एक मुद्दाम रचलेला वाचनीय वा श्रवणीय मजकूर, एक शैलीबद्ध अ-निर्हेतुक, अ-सहज संहिता ३) एक शैलीबद्ध भाषेचा कच्चा माल, द्रव्य म्हणून उपयोग करणारी आणि अर्थसंक्रामक चिन्ह (कम्युनिकेटिव्ह सिंबल) म्हणून वावरणारी स्वायत्त कलाकृती. अशा प्रकारे कवितेच्या नेहमीच्या व्याख्येपेक्षा अगदी निराळीच जाणीव ते करून देतात. म्हणजेच कविता हा भाषिक चिन्ह-व्यवहार आहे असे ते पटवून देतात. त्यांच्या शब्दात, ''कविता वाहनाच्याद्वारे भाषिक संकेतांनुसार कविता-पाठ्य चिन्हित होते आणि कविता पाठ्याद्वारा एक नवीन अनंगवस्तू चिन्हित होते.'' ''पण या नव्या चिन्हीकरण - व्यवहारातून उभी राहते ती एक स्वत:त सामावलेली, आतून अभंग अशी वस्तू'' (पृष्ठ १९). आपली नव्या चिन्हीकरणाची कल्पना आणि दि० के० बेडेकर यांनी मांडलेली 'विकल्पन' ही संकल्पना आणि संस्कृत साहित्य मीमांसेमधील 'भाव' या संज्ञेने सुरुवातीच्या काळात दर्शविली गेलेली संकल्पना एकच आहेत असेही ते नमूद करतात (पृष्ठ १९) आणि अशा प्रकारे कवितेच्या चर्चेला भाषाविज्ञान, चिन्हविज्ञान या शाखांशी जोडतात.

'कवितेचे सांगतेपण, करतेपण' या लेखाची सुरुवात 'कवितेचे असतेपण' या लेखाप्रमाणेच आर्चिबाल्ड मक्लिश या कवीच्या A poem should not mean / But be या विधानाने होते आणि या दोन लेखांमधील दुवाही त्यामुळे सिद्ध होतो. ''कवितेची व्याख्या करणे अवघड, कारण ती जात्या विवादग्रस्त संकल्पना आहे. ... कविता कवितांमध्ये ... फार/तर कुलसाम्य शोधावे हे बरे''. कवितेची व्याख्या करताना निर्माण होणारे वादविषय ध्यानात घेऊन डॉ० केळकरांनी कविता आणि काव्य यांच्या संबंधात १) आनंदवादी २) आशयवादी ३) रूपवादी ४) जीवनवादी आणि ५) आशयरूपवादी असे कविता-वाचकांचे वर्गीकरण केले आहे. हे वर्गीकरण या ग्रंथातील इतर काही

लेखांतही आपल्याला भेटते.

कवितेची भाषा आणि सामान्य व्यवहाराची भाषा ह्यांमध्ये फरक आहे हे नमूद करून पाठ्यरूपी कविता आणि कलावस्तुरूपी कविता यांचे नाते स्पष्ट करताना डॉ॰ केळकर तंत्र आणि शैली यांचे विवेचन करतात. हे विवेचन 'सांगतेपणा'च्या अर्थवत्तेच्या चर्चेचा पुढचा टप्पा गाठते. यानंतर 'सांगतेपणा'-कडून 'करतेपणा'कडे वाचकाला नेताना डॉ॰ केळकर, 'कलावस्तूमुळे आणखी काही चिन्हित होते का (पृष्ठ ४२) आणि कविता श्रोत्यावर - वाचकावर, श्रोत्यासाठी - वाचकासाठी काय करते, निर्मात्यावर आणि निर्मात्यासाठी काय करते आणि समाजासाठी काय करते असा मुद्दा विचारात घेतात आणि वर नमूद केलेले पाच प्रकारचे 'वादी' काय म्हणतील याची मांडणी करतात.'

कवितेची चर्चा करताना कोणकोणते मुद्दे विचारात घ्यावे लागतात याची ही उत्तम मांडणी आहे.

डॉ॰ केळकरांनी कल्पिलेले पाच गट/पाच भूमिका हवाबंद नाहीत, हे उघड आहे. त्यांच्यातल्या संभाव्य स्थित्यंतराची दखलही डॉ॰ केळकरांनी घेतली आहे. त्यामुळे मराठीतील काव्यमीमांसेच्या संदर्भातील त्यांची विधाने जशीच्या तशी स्वीकारणे कठीण आहे. तथापि या वादात वापरण्यात येणाऱ्या रूपवाद, जीवनवाद इत्यादी कल्पनांच्या भोंगळ वापराबद्दल ते आपल्याला जागृत (अॅलर्ट) करतात हे या विवेचनाचे खरे मोल आहे.

या दोन लेखांची नोंद थोडी विस्ताराने घेण्याचे कारण डॉ॰ केळकरांची मांडणीची पद्धत, त्यांच्या विवेचनपद्धतीच्या लकबी या दोन लेखांत स्पष्ट होतात आणि हीच दृष्टी मग इतर निबंधांतही दिसून येते. फक्त तपशील विषयानुसार बदलत राहतात. डॉ॰ चंद्रशेखर जहागिरदार यांनी आपल्या प्रस्तावनेत 'डॉ॰ केळकर... मांडणीची पूर्वतयारी म्हणून संबंधित विषयाचा एक नवीन संकल्पनात्मक नकाशाच व्यवस्थित मांडतात.' (पृष्ठ सात) असे म्हटले आहे. या नकाशात कोणत्या वाटा फसव्या म्हणून बंद आहेत, वर्ज्य आहेत, याचेही दिग्दर्शन डॉ॰ केळकर करतात अशी त्यात भर घालावीशी वाटते.

याच संदर्भात डॉ॰ केळकर यांच्या भूमिकेचा प्रश्नही अपरिहार्यपणे उपस्थित होतो. त्याचे उत्तर देताना 'मी स्वत:ची भूमिका मांडण्याचे कटाक्षाने टाळले आहे... तशी भूमिका मांडण्याची तार्किक अपरिहार्यता अंगीकारलेल्या वाटाड्याच्या कामासाठी वाटली नाही म्हणून टाळले आहे,' असे ते म्हणतात. डॉ॰ केळकरांची वाटाड्याची भूमिका इतर लेखांतही जाणवते. असे असले तरी भूमिकेचा प्रश्न उपस्थित होतोच. स्वत: डॉ॰ केळकरांनी 'लेखकाचे

मनोगत'मध्ये असे म्हटले आहे की ''मी मार्क्सवादी नाही - ना साम्यवादी ना समाजवादी. पुस्तकाच्या अग्रभागी जोडलेली नांदी पाहावी म्हणजे मी तटस्थ नाही एवढा दिलासा निश्चित मिळेल...माझी भूमिका सांगणे कसे गुंतागुंतीचे आहे याचाही उलगडा होईल.'' समीक्षेत तटस्थ कसे राहणार? समीक्षेतली विधाने... व्याख्यादेखील जात्या पक्षपाती आणि म्हणून वादग्रस्त आणि प्रश्नांकित असतात... समीक्षेतली विधाने वाईट अर्थाने वादग्रस्त होऊ नयेत म्हणजे वितंडाग्रस्त होऊ नयेत (म्हणून) सुसंगतपणे एक समान विवादभूमी सादर करणे महत्त्वाचे आहे.'' म्हणजे येथेही डॉ० केळकर एक प्रकारे आपली भूमिका अनुच्चारित ठेवतात. इतरत्रही 'मला स्वदेशीवादाचा, नेटिव्हिझमचा पुरस्कार करायचा नाही' (पृष्ठ २७४) अशा प्रकारची विधाने त्यांच्या लिखाणात आढळतात. तेव्हा आपण डॉ० केळकरांची भूमिका काय याचा पाठपुरावा न करता त्यांनी सादर केलेल्या साहित्यविचाराच्या मांडणीतून काय जाणवते याचा शोध घेणे इष्ट होईल.

१९६०नंतर मराठी समीक्षेमध्ये डॉ० रा०भा० पाटणकर, प्रभाकर पाध्ये यांनी 'जात्या वादग्रस्त संकल्पना' आणि संज्ञांची ओळख करून देऊन समीक्षेची समज वाढवणारी भर घातली. डॉ० केळकर या घडामोडीत सहभागी होते आणि त्यांच्या लिखाणात 'जात्या वादग्रस्त संकल्पना' आपल्याला बऱ्याच वेळा आढळून येते. या दोन व इतर काही लेखांतही त्यांच्या विवेचनामध्ये अमेरिकन नवसमीक्षक आणि इंग्रजी समीक्षकांचा पुष्कळ वेळा उल्लेख येतो. उदा० वेलेक आणि वॉरेन (थिअरी ऑफ लिटरेचर) जॉन क्रो रॅन्सम, टी०एस० एलियट, एल०सी० नाइट्स, आय०ए० रिचर्ड्स आणि प्रत्यक्ष उल्लेख नसला तरी 'इंटेन्शनल फॅलसी', 'अफेक्टिव्ह फॅलसी' या संज्ञांच्या वापरातून सूचित झालेले ब्रुक्स, विम्सॅट, बिअर्ड्सली ह्या टीकाकारांनी मांडलेल्या साहित्य-विचाराचे स्वरूप पाहिले तर काही गोष्टी जाणवतात. त्या, माझ्या मते, डॉ० केळकरांच्या मांडणीलाही लागू होतात.

१. या टीकाकारांची मांडणी विशेष करून 'कविता' या साहित्यप्रकाराशी निगडित आहे. त्यातही विश्लेषणासाठी ते लिरिकचा वापर करताना दिसतात. डॉ० केळकर स्वत: 'कविता' ही 'रोमँटिक लिरिक'पेक्षा निराळी आहे असे म्हणतात आणि 'कविता' अधिक व्यापक करतात. सैद्धांतिक समीक्षा या विभागातील पहिल्या पाच लेखांतील त्यांचे विवेचनही 'कविता' या साहित्य-प्रकाराशीच निगडित आहे. अर्थात त्यांच्या भाषावैज्ञानिक अंतर्दृष्टी (इनसाइट्स) मुळे, तंत्र, शैली यांच्या अतिशय सूक्ष्म, तरल विश्लेषणामुळे आणि चिन्हांकन

आणि चिन्हीकरण या संज्ञांच्या वापरामुळे वर नमूद केलेल्या टीकाकारांच्या ते कितीतरी पुढे गेले आहेत असे जाणवते. तरीही विवेचन प्रामुख्याने कवितेविषयी आहे असेच वाटते.

२. अशा कवितार्केद्री मांडणीमुळे साहित्याच्या इतर रूपांकडे उदा० कादंबरी आणि इतर गद्यप्रकार यांच्या सैद्धांतिक समीक्षेला फारसे स्थान उरत नाही. जेव्हा त्यांचा विचार होतो तेव्हा अशा कृती 'कविते'च्या गुणधर्मांनी युक्त असणाऱ्या असतात आणि त्यांचा विचारही जणू काही त्या 'कविता' असाव्यात अशा पद्धतीने भाषा, शैली अशा बाबींकडे विशेष लक्ष देऊन केला जातो.

३. अशा प्रकारे लिरिसिझम (कवितात्मता) या बाबीवर लक्ष केंद्रित केले तर साहित्य-विचारातील वास्तव, वास्तववाद यांकडे दुर्लक्ष होते. विम्सॅट आणि ब्रुक्स यांनी लिहिलेल्या 'लिटररी क्रिटिसिझम : ए शॉर्ट हिस्ट्री'मधील 'वास्तववाद' (रिॲलिझम) विषयक प्रकरण पाहिले तर अशा मांडणीमुळे साहित्याच्या काही अंगांकडे कसे दुर्लक्ष होते, इतकेच नव्हे तर त्यांच्यावर कसा अन्यायही होतो हे लक्षात येईल. मराठी साहित्याच्या दृष्टीने बोलायचे झाले तर वास्तववादाची सैद्धांतिक मांडणी नसणे ही मोठी उणीव होईल, कारण आधुनिक मराठी साहित्यामध्ये वास्तववाद महत्त्वाचा आहे.

'सैद्धांतिक समीक्षा' विभागातील ''भाषा आणि साहित्य'' या लेखातील मांडणी १९७० साली नक्कीच नवपथप्रदर्शक झाली असणार. आज सुमारे चाळीस वर्षांनंतर त्यातील बहुतेक विवेचन वाचकांच्या अंगवळणी पडले आहे.

''शैली आणि तंत्र'' या लेखातील प्रतिपादन थोड्याफार फरकाने आधीच्या लेखात आलेले आहे. ''कवितेचे सांगतेपण-करतेपण'' या लेखातील आनंददायी, रूपवादी, आशयवादी, जीवनवादी आणि आशयरूपवादी या वर्गीकरणाचा वापर करून या प्रत्येक भूमिकेचे तंत्र आणि शैली यांबाबत काय म्हणणे आहे हे मांडण्यात आले आहे. या विवेचनाच्या शेवटी शैली म्हणजे केवळ भाषासरणी हे समीकरण खोडून काढण्यात आले आहे. शैलीचा विचार माध्यमाशी निगडित आहे आणि म्हणून साहित्यशैलीला भाषाविज्ञानाची शाखा मानल्यामुळे 'शैली माध्यमाच्या पातळीवर असते आणि केवळ भाषा या साधनद्रव्याच्या पातळीवर नसते हे नजरेआड करणे' ही चूक होते. तसेच 'शैलीचा विचार ... समीक्षेसारख्या जात्या वादग्रस्त संकल्पना आणि मूल्य-विवेक यात गुंतलेला उद्योग आहे हे लक्षात न घेण्याची चूक' (पृष्ठ ५६) (होते) हा अतिशय मूलगामी आणि महत्त्वाचा विचार कबीर आणि तुकाराम यांच्या चार कवितांचा शैली-विचार करताना मांडला आहे.

'कलावती वाणी' या लेखात वाणीच्या बोलणे, म्हणणे आणि गाणे या तीन आविष्कारांची चर्चा करण्यात आली आहे. 'मनुष्यजीवनाच्या विविध आविष्कारांत वाणी, आणि शास्त्र आणि कला मोडतात.' भाषा ही वाणीची मुख्य परिणती आहे. वाणी हा भाषेचा मुख्य आविष्कार आहे. अनुभवाला आणि वर्तनाला अर्थ देण्याची, 'कशाला काय म्हणू नये' हे ठरवण्याची क्रिया भाषेच्या द्वारे पूर्ण होते.

भाषा ही वाणीची मुख्य परिणती असली तरी वाणी भावाविष्काराचे एक साधन आणि संगीताचे वाहनद्रव्यही असते. त्यामुळे वाणी जेव्हा 'कलावती' होते तेव्हा भावाविष्कार तसेच वाणीचे संगीताशी असलेले नाते विचारात घ्यावे लागते. डॉ० केळकर भाषा आणि संगीत या दोन ध्रुवांच्या दरम्यानची, त्यांना जोडणारी जी साम्यस्थळे आहेत त्यांचे विवेचन करतात. कलावती वाणी ही कलेचे वाहनद्रव्यही बनलेली असते. या वाहनद्रव्याचा जेव्हा आशयद्रव्याशी संयोग होतो तेव्हा कलेचे माध्यम निष्पन्न होते. (पृष्ठ ६७) डॉ० केळकर माध्यमाचा तंत्रपातळीवर आणि शैलीपातळीवर सूक्ष्म भेद स्पष्ट करीत विवेचन करतात. त्यामध्ये त्यांनी नाट्यधर्मी आणि लोकधर्मी या संज्ञा वापरताना भरताने त्यांचा दिलेला अर्थ जसाचा तसा ठेवलेला नाही. (डॉ० केळकर यांच्या एक्लेक्टिक - विविध क्षेत्रांतून आपल्याला उपयुक्त आणि आवश्यक 'कच्चा माल' घेऊन त्यातून नवीन मांडणी करण्याच्या - वृत्तीचे हे चांगले उदाहरण आहे.) परिणामत: या विवेचनात नाट्यधर्मी व लोकधर्मी यांच्या संदर्भात अंतर्दृष्टियुक्त (इन्साइटफुल) दिशादर्शक अशी अनेक विधाने आहेत. 'कलावती वाणी' हा या ग्रंथातील एक महत्त्वाचा लेख आहे. इतिकथनात या लेखातील मांडणीच्या उपयोजनाच्या काही दिशाही त्यांनी कळकळीने मांडल्या आहेत. पण गेल्या १४/१५ वर्षांत कुणी प्रतिसाद दिला नाही याची खंतही ते व्यक्त करतात, तिची गंभीर दखल अभ्यासकांनी घेणे आवश्यक आहे. डॉ० केळकरांच्या मते या अनास्थेचे कारण 'सध्याचा वैचारिक गारठा' हे आहे. कदाचित तथाकथित 'वैचारिक' दूधभात गटकन गिळण्याची सवय लागलेल्या वाचकांना हा तोंडाला भरपूर व्यायाम देणारा विचारप्रपंच मानवत नसावा.

या विभागातील ऊर्वरित लेख नाटक, संगीत आणि नृत्य या विषयांवर आहेत. डॉ० केळकरांची 'कलावती वाणी'मध्ये वाणी कलावती कशी आणि कोणत्या व्यवहारात होते हे ध्यानात घेतले तर ही मांडणी अपरिहार्य होते.

कवितेचा विचार करताना वापरलेल्या पद्धतीप्रमाणे येथेही विवेचन आहे. ''सर्जनशील लेखनाचा नाट्य हा सर्वोत्तम आणि सर्वात शाश्वत आविष्कार

आहे. काव्याच्या विविध प्रकारांपैकीच नाट्य एक प्रकार आहे.'' (पृष्ठ ७८) हे टी०एस० इलियटचे विधान उद्धृत केले आहे. नाटकाला सर्वश्रेष्ठ काव्य का मानतात याचा उलगडा करण्यासाठी डॉ० केळकर नाट्याची तीन वैशिष्ट्ये विशद करतात :

१. कवी-निरपेक्ष आणि रसिक-निरपेक्ष असा अन्योन्य संबंध केंद्रस्थानी असणे.

२. नाट्यकाव्यातला वर्तमान(काळ) भविष्यकाळाला पोटात बाळगणारा, भविष्यकाळावर अवलंबलेला असतो. या वैशिष्ट्याला केळकर 'भविष्यगर्भ वर्तमानकाळ' म्हणतात.

३. नाटक रचणारा कवी असो,... दिग्दर्शन करणारा कविमित्र असो, कविमित्राचे रंगकर्मी मित्र किंवा प्रयोगात तन्मय होणारा रसिक ... आपापल्या जागी राहून पुन्हा एकत्र काम करण्याचा आनंद नाटकात मिळून जातो. (पृष्ठे ७६-७८)

आपल्या या विवेचनाच्या पुष्टीसाठी डॉ० केळकर नाट्यकर्मींची स्वभाववैशिष्ट्ये विशद करतात. ती कीट्सच्या दोन सुप्रसिद्ध वचनांच्या आधारे मांडली आहेत. सर्व रंगकर्मींना - नाट्यकवी, नाट्यदिग्दर्शक, रंगकर्मी आणि नाट्यरसिक या सर्वांना 'परकाया प्रवेश' करण्याची क्षमता आवश्यक असते. 'तटस्थता आणि आत्मियता यांच्या पलीकडे जाणे म्हणजे तन्मयता (पृष्ठ ७९)'.

नाटकातल्या 'भविष्यगर्भ वर्तमानाने निर्माण केलेला ताणतणाव हाताळण्यासाठी रंगधर्मीजवळ आवश्यक असणारे स्वभाववैशिष्ट्य म्हणजे एक प्रकारची बौद्धिक तितिक्षा.'

नाटकाच्या तिसऱ्या वैशिष्ट्याला डॉ० केळकर समाराधन म्हणतात. समाराधन म्हणजे सर्व संबंधितांची एकत्र खुषी होणे आणि एका घटकाने दुसऱ्याची खुषी राखणे.

अशा प्रकारे परकायाप्रवेशाची क्षमता, वैचारिक आणि भावनिक तितिक्षाबळ आणि समाराधनशीलता हे तीनही गुण नाट्यकर्मींच्या अंगी असावे लागतात. नाट्यकर्म आणि व्यक्तिमत्त्व विकास यांचा संबंध दोन्ही दिशांनी आहे. तो परस्परपोषक आहे हे सांगून डॉ० केळकर या दृष्टीने नाट्यकर्मींच्या शिक्षणाच्या दृष्टीने जी मांडणी करतात त्यात शिक्षकी तळमळ व्यक्त होते. तसेच 'या तीन गुणांच्या जोपासनेला एक सामाजिक बाजू आहे' (पृष्ठ ८२) याचेही निकडीचे भान त्यांना आहे हे दिसते. या लेखाच्या शेवटच्या भागात

हिंदी भाषी प्रदेशात 'नाटका'ची जी अवस्था आहे तिच्याबाबत उद्बोधक विवेचन केले आहे.

'नाटक : एक होणे' हा लेख मांडणीच्या बाबतीत 'कवितेचे असतेपण' या लेखासारखा आहे, हे नाटक म्हणजे काय ह्या अतिशय सूक्ष्म विश्लेषणावरून सिद्ध होते. ह्या लेखाच्या शेवटच्या भागात डॉ० केळकरांनी अनेक प्रश्न असलेल्या दोन कार्यक्रमपत्रिका सादर केल्या आहेत. त्या किंवा लेखाच्या आधीच्या भागात त्यांनी वेळोवेळी उपस्थित केलेले प्रश्न पाहता डॉ० केळकरांची त्यांच्या मांडणीच्या बाबतीत आग्रही भूमिका नसून वाद-संवादातून तत्त्वबोध करून घेणाऱ्या अधिकारी जिज्ञासूची आहे असे दिसते.

संगीत किंवा नृत्य या कलाप्रकारांची चिकित्सा करतानाही ('संगीताची भाषा आणि मनोव्यापार : एक प्रश्नाचे मोहोळ,' 'नृत्य, कथक, आणि रोहिणी भाटे : एक सम्यग्दर्शन') यांत डॉ० केळकरांनी अशाच प्रकारची कळकळ दाखवली आहे. त्यांचा संगीतावरचा लेख ते एक उत्तम 'म्युझिकॉलॉजिस्ट' आहेत याचा प्रत्यय देतो. संगीताच्या अभ्यासाच्या तीन पायऱ्या विशद करून भारतीय संगीत परंपरांच्या (उत्तर हिंदुस्थानी आणि कर्नाटकी) अभ्यासात उद्भवणारे काही प्रश्न त्यांनी चिकित्सक पद्धतीने मांडले आहेत. इतर म्युझिकॉलॉजिस्टांप्रमाणे ही मांडणी नाही. ती केवळ अमूर्त, सैद्धांतिक पातळीवरची, पढीक (ॲकॅडेमिक) नाही तर संगीतव्यवहाराच्या प्रत्यक्ष अवलोकनातून आणि भारतीय संगीत हे जे आपले मोलाचे सांस्कृतिक संचित आहे त्याबद्दलच्या आस्थेतून केलेली मांडणी आहे. 'भारतीय संगीत' हा आपल्या रास्त अभिमानाचा विषय आहे. दुर्दैवाने या संगीताचा जो सैद्धांतिक आणि विश्लेषणात्मक अभ्यास भारतात होत आहे त्याबद्दल रास्त अभिमान बाळगण्यासारखी स्थिती नाही' या खेदजनक वस्तुस्थितीमुळे व्यथित होऊन ही मांडणी केली आहे. नाटकावरच्या लेखांप्रमाणेच येथेही डॉ० केळकरांनी चर्चा योग्य दिशेने जाणारी, तत्त्वबोधाचा वेध घेणारी असावी म्हणून प्रश्नांचे मोहोळ उठवलेले आहे.

'द्रव्य', 'माध्यम' आदि संज्ञांचे सूक्ष्म विश्लेषण करून मांडणी करण्याची पद्धतीच नृत्याच्या खास वेगळेपणाची जाण ठेवून त्यांनी वापरली आहे. 'नृत्य' म्हणजे काय आणि काय नाही याची जाणीव वाचकाला या लेखातून मिळते.

ग्रंथाच्या 'आस्वादाकडून समीक्षेकडे' या दुसऱ्या भागात पाच लेख आहेत. 'आस्वाद-व्यापार' हा १९७० पूर्वीचा लेख आहे असे त्याला जोडलेल्या इतिकथनावरून ध्यानात येते. त्या काळी मराठी साहित्यचर्चेमध्ये 'सौंदर्यशास्त्रीय' चर्चेची हवा होती आणि दबदबाही होता. डॉ० रा०भा०

पाटणकर, प्रभाकर पाध्ये यांची नावे ठळकपणे आठवतात. सौंदर्यशास्त्रातील बा०सी० मर्ढेकरांचे योगदान पुन्हा एकदा तपासून घेणे हा एक प्रमुख मुद्दा या चर्चांमध्ये असे. डॉ० केळकरांनीही या चर्चेत प्रथमपासूनच महत्त्वाची भूमिका बजावलेली आहे. त्यांनी 'सौंदर्यशास्त्र' या संज्ञेऐवजी 'आस्वाद-व्यापार' ही संज्ञा सुचवली आहे आणि तिचे त्यांनी दिलेले स्पष्टीकरण 'आस्वाद-व्यापार', 'आस्वाद-मीमांसा' यांचे क्षेत्र अधिक व्यापक करते हे दिसून येते. 'आस्वाद-व्यापाराविषयी' या लेखात आस्वाद-व्यापार, आस्वाद्य वस्तू, आस्वाद घटना, आस्वाद गुण यांचा काटेकोरपणे मागोवा घेतला आहे आणि हे करताना अनेक घोटाळ्यांवर, कमतरतांवर प्रकाश टाकला आहे. शैलीबद्दलचा त्यांचा दृष्टिकोण या ग्रंथातील इतर लेखांमध्येही स्पष्ट झाला आहे. या लेखातही त्यांनी केलेले शैलीचे विवेचन मुळातून पाहावे. 'शैलीमीमांसा कुठल्या पद्धतीने होऊ शकेल आणि आस्वाद-व्यापार मीमांसेचा ती एक महत्त्वाचा भाग कशी ठरते... शैलीचा नीट विचार झाल्याशिवाय आस्वाद-व्यापारासंबंधीच्या कूट प्रश्नांचा उलगडा होणार नाही' अशी ही भूमिका आहे. 'समीक्षक : एक साक्षीभोक्ता' या लेखावर 'थिअरी ऑव्ह लिटरेचर' ची दाट छाया आहे. समीक्षा-व्यवहारामध्ये नेहमी उपस्थित होणाऱ्या 'साहित्याचे सर्वस्पर्शित्व लक्षात घेऊन त्याचा आंतरक्षेत्रीय अभ्यास व्हायला पाहिजे' येथून सुरुवात करून 'साहित्यिक रसग्रहणातून साहित्य-समीक्षा' आणि 'समीक्षेचे सहभागी निरीक्षण म्हणजे साहित्य-मीमांसा' (पृष्ठ १५५) असे डॉ० केळकर म्हणतात. काही प्रमाणात या लेखातले प्रतिपादन आता आपल्या अंगवळणी पडले आहे. (ते सर्वस्वी स्वीकारले आहे किंवा स्वीकारावे असे नाही.) पण तरीही डॉ० केळकरांच्या विश्लेषक अन्वेषण पद्धतीचा नमुना म्हणून या लेखाकडे पाहाता येईल.

'मूल्यनिर्णय आणि साहित्यव्यवहार' हा लेख साहित्यकृती विषयक मूल्यनिर्णयाची काटेकोर आणि बहुसमावेशक चौकट निर्माण करतो. येथेही डॉ० केळकरांच्या 'असतेपण, सांगतेपण आणि करतेपण' या त्रयीची उपस्थिती जाणवते. आधीच्या लेखांप्रमाणेच या लेखातले बरेचसे मुद्देही वाचकांच्या परिचयाचे झाले असतील. 'इतिहास, साहित्याचा इतिहास आणि समीक्षकाचे कार्य' हा एक महत्त्वाचा लेख आहे. नेहमीप्रमाणे डॉ० केळकर प्रथम 'इतिहास' ही संकल्पना स्पष्ट करतात आणि या विवेचनात उपस्थित झालेल्या मुद्द्यांचा साहित्याच्या इतिहासाशी काय अनुबंध असतो, असावा यांचे दिग्दर्शन करीत साहित्याच्या इतिहासाची मांडणी करतात हे माझ्या मते नोंद घेण्याजोगे आहे.

'कवितेचे सांगतेपण-करतेपण' या लेखात समीक्षेतील पाच विविध भूमिका

ते पुन्हा मांडतात आणि या पाच भूमिकांची साहित्य-इतिहासाविषयी काय धारणा असेल याची मांडणी करतात. येथील फरक-साम्य यांच्या विश्लेषणामुळे आपल्या विचाराला नव्याने चालना नक्कीच मिळते.

'कला आणि कलाव्यवहार' या विभागातील पहिले दोन लेख - 'शिक्षणाचे एक माध्यम - कला' आणि 'अध्यापन आणि कवितेचे अध्यापन' - डॉ० केळकरांना शिक्षक या नात्याने कला आणि कविता यांच्याविषयी किती आस्था आहे याची साक्ष देतात.

'व्यावहारिक समीक्षा' या विभागात काही साहित्यकृतींची समीक्षा आहे. 'कोसला'चे परीक्षण आणि लक्ष्मण माने यांच्या 'उपरा'चे परीक्षण सोडता बाकी सर्व परीक्षणे कवितांची आहेत. 'कोसला' तिच्या शैलीमुळे रूढ कादंबरीपेक्षा निराळी आहे आणि 'उपरा'चे विश्लेषण प्रामुख्याने भाषा आणि भाषिक स्थित्यंतर याविषयी आहे हे ध्यानात घेतले तर इथे प्रस्तुत केलेली समीक्षा (ती अतिशय अंतर्दृष्टिपूर्ण आणि कलाकृतींचे अंतरंग सूक्ष्मपणे उलगडून दाखवणारी आहे हे मान्यच आहे.) कविता, शैली आणि भाषाव्यवहार या अंगांनी जाणारी आहे असे दिसते.

'भारतीय ललितकला (आधुनिक) वयात येतात' हा लेख - डॉ० केळकर त्याला निबंध म्हणतात - सांस्कृतिक समीक्षेच्या दृष्टीने अतिशय महत्त्वाचा आहे. एकोणिसाव्या शतकापासून भारतीय समाजजीवनात जो गुणात्मक फरक घडून आला त्याचे स्वरूप आणि व्याप्ती (खरे तर मर्यादा) - ललितकलांच्या संदर्भात - स्पष्ट करणारा हा लेख आहे. या फरकाला किंवा परिवर्तनाला काय म्हणायचे येथून डॉ० केळकर आपल्या विवेचनाला सुरुवात करतात. त्याला रिनेसन्स (पुनरुज्जीवन) म्हणायचे की 'एनलायटन्मेंट' (प्रबोधन) म्हणायचे? नेहमीप्रमाणे डॉ० केळकर दोन्हींची उकल प्रथम करतात. युरोपियन रिनेसन्सचा 'विद्यांचे पुनरुज्जीवन' हा एक पैलू होता. त्याच्या इतर राजकीय, सांस्कृतिक, आर्थिक पैलूंचाही डॉ० केळकर मार्मिक खुलासा करतात. एकोणिसाव्या शतकापासून झालेल्या भारतातील पुनरुत्थानाबद्दल विवेचन करताना ते या स्थित्यंतराचा युरोपीय आधुनिकतेशी संबंध जोडतात आणि त्या आधुनिकतेशी निगडित असलेल्या बुद्धिप्रामाण्यवाद, उपयुक्ततावाद तसेच समता आणि राष्ट्रभावना ही मूल्ये आणि ऐहिक परतत्त्वाच्या संदर्भात व्यक्तिवादाची कास धरणे आणि आध्यात्मिक परतत्त्वाच्या संदर्भात इहवादाचा आश्रय करणे या वैशिष्ट्यांचा परामर्श घेतात.

पश्चिमेकडून आलेल्या या विचारांबाबत डॉ० केळकर एक महत्त्वाचा विचार

मांडतात. युरोपियन स्थित्यंतर 'आतून उपजलेले' होते तर त्याचा भारतीय उपखंडात झालेला स्पर्श बाह्यप्रेरणेमुळे झाला, यामुळे दोन क्रियांमध्ये जमीन अस्मानाचे अंतर पडले असे ते म्हणतात (पृष्ठ २६७). आणि जरी ते मांडत नसले तरी या अंतराला १९व्या शतकारंभाची भारताची सांस्कृतिक चणही कारणीभूत आहे. त्यामुळे भारतीय पुनरुत्थान अनेकश: दुभंगलेले आहे (पृष्ठ २६७). निरनिराळ्या जमातींत, प्रदेशांतही हा परिणाम कमीअधिक प्रमाणात जाणवतो. या भारतीय प्रबोधनाचा परिणाम तत्कालीन ललितकलांशी कसा पोचतो हे ऊर्वरित लेखात मांडले आहे. मांडणीचे कार्य 'भावी संशोधनासाठी एक दिशा सुचविणे एवढेच राहील' (पृष्ठ २६८) असे ते स्वत:च म्हणतात. भारतीय ललितकलांचे त्यांनी चार गटांत वर्गीकरण केले आहे. इंग्रजी भाषेचा उपयोग, वापर यांवर या कलांच्यात कमीअधिक प्रमाणात आणि खरीखुरी अथवा व्याज-आधुनिकता येणे कसे अवलंबून होते याचे दिग्दर्शन येथे होते. ब्रिटिशांनी दिलेल्या आश्रयानंतर काही कला ॲकॅडेमिक झाल्या, तर इतर काही कला ब्रिटिशांच्या आगमनानंतर झालेल्या सामाजिक सांस्कृतिक पुनर्रचनेमध्ये साहित्य मध्यमवर्गाच्या प्रभुत्वाखाली जाण्यात आणि परिणामत: संकुचित होण्यात झाला. या कोंडीतून सुटण्याचे काही मार्ग (लोकसाहित्याचा वाढता प्रभाव) त्यांनी सुचवले आहेत. 'पाश्चात्त्य प्रभाव भारतीय संदर्भात आत्मसात करायचे कुणाच्या मनातही आले नाही' (पृष्ठ २७२), ही 'घटी'ची बाजू मांडल्यावर डॉ० केळकरांनी प्रबोधनातून मिळालेल्या विधायक स्वरूपाच्या जमेची बाजू मांडली आहे. त्यात इतर आशियाई किंवा वसाहती असलेल्या देशांपेक्षा भारतात प्रबोधन अधिक प्रमाणात रुजले आहे. याबाबत 'हिंदूंची एकंदर जीवनदृष्टी आणि आधुनिकतेची मूल्ये यांमध्ये एक लक्षणीय बंध आहे' असे प्रतिपादन डॉ० केळकर करतात.

आधुनिकतेचे आव्हान भारतीयांचे कलाजीवन पेलेल का? हा प्रश्न उपस्थित करून त्यांनी याबाबत देशीवादाचा पुरस्कार त्याज्य ठरवला आहे. त्याबाबतीत 'स्व-राज्य' कल्पनेचा पाठपुरावाच आपल्याला आधुनिकतेला समर्थपणे सामोरे जाण्यासाठी उपयोगी पडणार आहे असे ते सुचवतात.

डॉ० केळकरांच्या विवेचनातल्या तपशिलांबाबत, काही निष्कर्षांबाबत मतभेद होऊ शकतील. एका गोष्टीचा उल्लेख करावासा वाटतो. डॉ० मीनाक्षी मुखर्जी त्यांच्या 'द पेरिशेबल एंपायर' या पुस्तकात डॉ० डी०आर० नागराज यांना उद्धृत करतात. "It is possible to identify three streams in the existing theories of colonialism : the schools that are defined by

the idea of total conquest, the ones that are organised around the idea of a cultural soul and the ones that stress mutual transformation. The first is represented by the likes of Frantz Fanon, Albert Memmi and Edward Said, the second by the likes of Anand Kumarswamy and Sayyad Hossein Nasr, the third by Ashis Nandy." डॉ० डी०आर० नागराज यांनी आपल्या 'एग्झाइल्ड अॅट होम' या संग्रहाच्या प्रस्तावनेत हे विवेचन केले आहे. डॉ० मुखर्जी यांनी तिसऱ्या गटात सुप्रसिद्ध समीक्षक हरीश त्रिवेदी यांचाही समावेश केलेला आहे.

डॉ० केळकर यांच्या विवेचनात रवींद्रनाथ ठाकुरांचा दोनतीन वेळा ओझरता उल्लेख येतो, पण आधुनिकतेच्या संदर्भातले रवींद्रनाथांचे योगदान त्यांनी विचारात घेतलेले नाही. कुमारस्वामींचाही उल्लेख नाही. यांच्या विचारांचा परामर्श माझ्या मते जमेची बाजू वाढवणारा आहे. देशीवादाच्या मुद्द्यावर डॉ० केळकरांची भूमिका मान्यच करावी लागते. पण स्वतःचा सांस्कृतिक आत्मा ओळखण्याचा आग्रह धरणाऱ्या आणि तिसऱ्या गटातल्या, समावेशक असण्याचा आग्रह धरणाऱ्या विचारवंत, समीक्षक आणि कलाकारांचाही विचार प्रस्तुत ठरला असता.

या परीक्षणाच्या आरंभी म्हटल्याप्रमाणे डॉ० केळकरांचा बौद्धिक आवाका स्तिमित करणारा आहे. त्यांची अन्वेषण-पद्धती मर्मग्राही, अंतर्दृष्टी देणारी आहे. वाचकाशी मोकळेपणाने संवाद करीत (कधीकधी चिमटे काढीत) ते मांडणी करतात. त्यांच्या या प्रचंड बौद्धिक प्रयत्नांना साजेसा प्रतिसाद (संवाद, वाद-विवाद या स्वरूपात) मिळत नाही याविषयी ते रास्तपणे दुःखी आहेत. पण हे लेख वाचताना आणि डॉ० केळकरांची व्यथा समजून घेत असताना असेही वाटते की या स्तब्धतेकडे सद्यकालीन (अपरिहार्य?) वैचारिक गारठा असे म्हणून चालणार नाही. डॉ० केळकरांना अभिप्रेत असलेला वाद-संवादाला अनुकूल असा बौद्धिक स्वरूपाचा पुरेसा सशक्त 'पब्लिक स्फिअर' आपण अजूनही निर्माण करू शकलेलो नाही. १९व्या शतकाच्या आरंभी गद्याचा अवतार झाला. त्याच्याशीही सुसंगत असा अत्यंत प्राथमिक स्थितीतल्या वादविवाद-तत्त्वबोधाला आवश्यक असा 'पब्लिक स्फिअर' अस्तित्वात आला होता, पण तो सतत शबल राहिला आहे. इंग्लंडमध्ये अठराव्या शतकात अशा प्रकारचा 'पब्लिक स्फिअर' निर्माण करण्यात नियतकालिकरूपी व्यासपीठाचा आणि 'कॉफी हाऊस'रूपी सामाजिक संस्थांचा मोठा सहभाग होता. आपण आपल्याभोवती घालून घेतलेल्या अनेक कुंपणांमुळे आपल्याकडे हा 'पब्लिक

स्फिअर' पुरेशा परिणामकारकपणे कार्य करू शकत नाही. डॉ० केळकरांनी जन्माला घातलेले 'भाषा आणि जीवन' आता खूपच बाळसेदार झाले आहे. ते अशा प्रकारच्या वादसंवादासाठी आदर्श व्यासपीठ होऊ शकेल आणि त्यातील चर्चांमुळे डॉ० जहागिरदार यांनी या ग्रंथाच्या प्रस्तावनेत म्हटल्याप्रमाणे ही 'रुजुवात' सार्थ होईल.

■

दूरभाष : 020-2542 44308
भ्रमणभाष : 098819 00608

**शब्द : देशी आणि विदेशी**

भिन्न भिन्न संस्कृतींच्या किंवा भाषांच्या लोकांचा संबंध आला म्हणजेही नवे नवे परकी भाषेतील शब्द भाषेत रूढ होतात. द्राविडांचा आणि मराठ्यांचा संबंध आला आणि पुष्कळ द्राविडी शब्द मराठीत शिरले. महमदीयांचा आणि मराठ्यांचा संबंध आल्याबरोबर किती तरी फार्शी, अरबी व तुर्की शब्द मराठीत घुसले. तसेच इंग्रजांच्या आमदानीत मराठी भाषेत इंग्रजी शब्दांचा भरणा पुष्कळच झाला आहे. मराठी भाषेतून हे परकी शब्द काढून टाकण्याची चळवळ काही लोकांनी सुरू केली आहे. ही चळवळ कितीही सद्हेतुमूलक असली तरी भाषेच्या वाढीच्या दृष्टीने हानिकारक आहे. संस्कृति-संस्कृतींचा मिलाफ झाला की, शब्दांचे लोण येणारच. ते टाळता येतच नाही. शब्द टाळावयाचे असले तर संस्कृतिसंयोगाचाच विच्छेद केला पाहिजे. तो न करता केवळ शब्द उचलून काढणे म्हणजे बैलाच्या पुढे गाडा बांधण्यासारखे किंवा पायाच्या अगोदर कळस उभारण्यासारखे आहे. शिवाय कोणताही शब्द भाषेत उत्पन्न होऊन जो रूढ होतो तो त्याच्या मुळाशी असलेल्या कल्पनेच्या (कन्सेप्ट) जोरावर होतो. ती कल्पना नाहीशी झाली तरच तिच्यावर आधारलेला शब्द भाषेतून नाहीसा होतो. वेदी, दर्वी, आसंदी, होता, प्रतिहर्ता, पुरोडाश वगैरे वेदांतील शब्द पुढे बेपत्ता झाले; किंवा मवला, एकवंकी, रासौभ, राऊवे, राभस्य, आविस, आहाणा हे ज्ञानेश्वरीतील शब्द किंवा हुंबते, बोहरी, बोगरू, निकुरे, लास, वारुवा, झांजर, वगैरे नामदेवाचे शब्द पुढच्या मराठीत बेपत्ता झाले, ह्याचे कारण त्यांच्या मुळाशी असलेल्या कल्पना नष्ट झाल्या हेच होय. शब्द मरतात ह्यांचे कारण त्यांची मूळची कल्पना मरते हे होये; तेव्हा कल्पना जोपर्यंत जिवंत आहे तोपर्यंत तद्दर्शक शब्द नाहीसा कसा होणार? असे शब्द मुद्दाम नाहीसे केले तर दुसरे परकी शब्द त्यांचे स्थान पटकावितील व दुसऱ्या चांगल्या शब्दांना हद्दपार करतील. तदर्थी मराठी शब्द रूढ करावयाचे असल्यास त्यांची कल्पना (कन्सेप्ट) मराठीत स्वतंत्र अशी निर्माण केली पाहिजे. सर्व शास्त्रनिर्मिती व कलाविकास मराठीत करून कल्पना मराठीत उत्पन्न केल्या तरच तद्दर्शक शब्द मराठीत रूढ होतील.

- कृ०पां० कुलकर्णी

*'मराठी भाषा - उद्गम व विकास'मधून*

पुस्तक-परीक्षण

# वेगळी दृष्टी देणाऱ्या कवितांचा सफल अनुवाद

**जया परांजपे**

(परीक्षित पुस्तक : स्त्री माझ्या आत - पवन करण. अनु० बलवंत जेऊरकर, शब्द प्रकाशन, मुंबई. पृष्ठे ९९. किंमत रु० १००/-)

डॉ० बलवंत जेऊरकर यांनी हिंदीतील आजचे आघाडीचे कवी श्री० पवन करण यांच्या 'स्त्री मेरे भीतर' या वागीश्वर पुरस्कार मिळालेल्या कवितासंग्रहाचा 'स्त्री माझ्या आत' या शीर्षकाने मराठीत अनुवाद केला आहे.

अनुवादकाने 'पुस्तकाविषयी थोडेसे...' लिहिताना शेवटी 'या कवितांच्या निमित्ताने निषिद्ध क्षेत्रातलं हे दमदार पाऊल मराठीत आपला वेगळा ठसाच उमटवणार नाही तर आपली वाटही बनवेल,' असा विश्वास व्यक्त केला आहे. यावरून काव्याशयाच्या कक्षा रुंदावणारं वेगळं दालन मराठी वाचकांसमोर खुले करणे, ही या अनुवादामागची प्रेरणा असल्याचे जाणवते.

अनुवादकाच्या वरील विधानाच्या पुष्टीसाठी काही कवितांचा उल्लेख करता येईल. 'पुरुष' कवितेतील मूल देऊ न शकणाऱ्या 'पुरुषपति'ची घुमसट, आपल्याच हाडामांसातून जन्मलेल्या बाळासाठीची आंतरिक ओढ, ती पूर्ण न करू शकण्याची अगतिकता व ह्यावर मनोमन काढलेले उपाय साहित्यात निषिद्ध मानलेल्या पण मनाचा ठाव घेणाऱ्या शब्दांत यापूर्वी असे मांडले गेले नसतील. प्रेमात पडलेल्या विधवेच्या किशोरवयीन मुलीची त्या प्रेमभावनेबाबतची हळवी, उत्फुल्ल व आनंदाने गिरक्या घ्यायला लावणारी संवेदना क्वचितच कुठे व्यक्त झाली असेल. कॅन्सरमुळे एक स्तन काढून टाकल्यावर जीवनदान मिळाल्याच्या कृतार्थतेच्या भावेनच्या ओझ्याखाली स्वाभाविकपणे दबून गेलेली, खूप काहीसं गमावण्याची पतीच्या अंतर्मनातील वेदना व अगतिकता काव्यानुभवात बहुधा यापूर्वी उतरली नसेल.

या काहीशा वेगळ्या जाणिवांबरोबरच रूढ आशयसूत्रे या कवितांमध्ये नवीन उपमा व नवीन शब्दकळा घेऊन नव्या रूपात व्यक्त होताना दिसतात. 'शरीराला काचणारा जातीचा हा फास, पुन:पुन्हा ... तुला ... करून देईल जाणीव, तुझ्याशेजारी झोपलेल्या माणसाच्या जातीची.' 'मी म्हणत नाही की शरीर ही अपवित्र गोष्ट आहे, पण सतत त्याची काळजी करून झुरत

राहण्याइतकी ती पवित्रही नाही.' 'तुझ्यात आणि तिच्यात सगळं काही छान आहे. सगळं छान असणं म्हणजे सगळं काही मनासारखं असणं असं नव्हे.' 'अशी मुलगी पाहिजे - जिचे दोन्ही पाय असावेत शाबूत, पण तरीही ती असावी लंगडी' अशी कितीतरी उदाहरणं या संदर्भात नोंदवता येतील, ज्यामुळे या कविता आपला वेगळा ठसा उमटवतात.

याशिवाय स्त्रियांवर होणारे अन्याय, अत्याचार, बलात्कार, मारहाण व शारीरिक - मानसिक छळांचे संदर्भ बऱ्याच कवितांत येतात. 'हा आवाज मला खरा वाटत नाही' या कवितेत गुजरात दंग्याच्या संदर्भात स्त्री-अत्याचाराचं सनातन दाहक वास्तव तितक्याच दाहक भाषेमुळे मनाचा ठाव घेते, मनाला भिडते. पारंपरिक सामाजिक - सांस्कृतिक चौकटीतील आदर्श सुनेबाबतच्या अपेक्षा व तिची आचारसंहिता 'स्त्री-सुबोधिनी' कवितेत जाहिरातीच्या भाषेच्या बाजात व्यक्त होते. स्त्रीचा देह व सौंदर्य भोगणे आपला जन्मसिद्ध हक्क आहे असे मानणारी, स्त्रीकडून त्यागाची व समजूतदारपणाची अपेक्षा करणारी 'पुरुषी प्रवृत्ती' काही कवितांमध्ये प्रत्ययास येते. पण आपल्या मनातील व जनातील स्त्रीच्या या ·भोगवट्याकडे कवितांमधील पुरुष कधी उपरोधाने, कधी आत्मान्वेषी नजरेतून व कधी गंभीर चिंतनातून पाहताना दिसतात व या कविता वाचकालाही अंतर्मुख करतात.

या संग्रहात 'स्त्री हट्ट'सारखी खोडसाळ व खेळकर शैलीतील स्त्रीच्या वागण्याचा व मनाचा वेध घेणारी सुंदर कविता आहे. मुलींच्या बालपणातील निरागस आनंद टिपणाऱ्या 'सांझी' व 'गिल्ना'सारख्या कविता आहेत. मुलीच्या सौंदर्यामुळे समाजभयाने ग्रासलेला पण प्रेमाच्या वेडाला तिनं नाकारूही नये म्हणणारा व वेळ आल्यास तिच्या पाठीशी खंबीरपणे उभा राहू पाहणारा पिता आहे. बहिणीच्या रक्षणाला तत्पर पण तिच्या त्याच प्रेमाची प्रचीती पटल्यावर भाऊपणा विरघळलेला भाऊ आहे. मातृत्व जपणारं बोराचं झाड आहे व देहानुभवाच्या वाटेवरून मनोमीलनापर्यंत पोहोचलेले पति-पत्नी आहेत.

एकीकडे 'खरंतर कौमार्य ही माझ्या लेखी, काहीही करून जतन केलीच पाहिजे अशी संपत्ती नव्हती'. 'मी त्याला बंधन नाही, माझा हक्क समजते', 'कोणताही अपराधबोध न ठेवता त्याला हवी तशी मी कोरी करकरीत नाही' असे सांगणारी व पुरुषाशिवायही आपण जगू शकतो हे दाखवून देणारी आधुनिक स्त्री आहे. त्याच वेळी 'तीसुद्धा तिच्या इच्छांच्या जळात दूरवर जाऊ शकते.' 'तिलाही नवरा व प्रियकर असे दोन वेगळे पुरुष हवे असू शकतील जसे मला बायको व प्रेयसी वेगळी हवी असते.' किंवा 'तिच्या इच्छेच्या बाणांनीच मारायला निघालेला' पुरुषही कवितांत आहे.

एकूण स्त्री-केंद्रित या कवितांमध्ये काही अपवाद वगळता बहुतेक कवितांत 'स्त्री' विषय म्हणून आलेली आहे व पुरुष पिता, भाऊ, पती, प्रियकर वा तटस्थ निवेदक या भूमिकांतून तिच्या स्थितीचा वेध घेताना दिसतो; तथापि पुरुषांची व कवीची दृष्टी 'पुरुषी जुलमी प्रवृत्ती' बदलण्याची अपेक्षा करणारी वाटते. त्यामुळे 'माणूस म्हणून स्वत:कडे पाहिलं जाण्याचा व माणूस म्हणून जगण्याचा हक्क' मागणाऱ्या आजच्या स्त्रीच्या संघर्षाला पूरक जाणीव व सामाजिक भान या कविता देत असतील तर त्याही दृष्टीने मराठीत त्यांचे स्वागत होईल.

या संग्रहातील बऱ्याचशा कविता अमूर्त, उदात्त व तरल भावसौंदर्य तशाच तरल आणि प्रतीक-प्रतिमांच्या भाषेत व्यक्त करणाऱ्या नसून वास्तवातील संदर्भ, घटना व प्रसंगाच्या पृष्ठभूमीवर संबंधित पात्रांचे मनोभाव टिपणाऱ्या, नेणिवेतील अस्फुट भाव-भावनांना शब्दांत पकडणाऱ्या, विवरणातील काव्य टिपणाऱ्या व गद्याकडे झुकणारी काव्यलय जपणाऱ्या आहेत.

कवितांची ही शैली अनुवादाच्या दृष्टीने काहीशी अनुकूल वाटली तरी काव्यानुवादाची म्हणून जी आव्हानं आहेत ती पेलणं अनुवादकाच्या दृष्टीने तारेवरची कसरतच असते.

सुदैवाने डॉ० जेऊरकर यांना हिंदी-मराठी भाषा व साहित्याची चांगली जाण आहे. अनुवादाचं सातत्य त्यांनी टिकवून ठेवलेले आहे इतकेच नव्हे तर कुशल अनुवादक म्हणून त्यांची स्वतंत्र ओळखही निर्माण होत आहे.

(वरील सर्व पार्श्वभूमीवर) ह्या अनुवादाचं परीक्षण करत असताना सर्वांत प्रथम जाणवणारी गोष्ट ही आहे की हा अनुवाद 'आशयलक्ष्यी' आहे. मूळ कवितांतील आशयाशी जास्तीत जास्त इमान राखून किंवा ते राखण्यासाठी अनेक युक्त्यांचा वापर अनुवादात केलेला दिसतो, तर काही ठिकाणी करावा लागलेला दिसतो. वास्तविक मूळ कवितांमधील अर्थ व अभिव्यक्तीचं अद्वैत अनुवादाच्या प्रक्रियेत द्वंद्व बनून समोर येत असतं. कारण मूळ आशयासाठी दुसऱ्या भाषेत तीच शब्दकळा असेलच असं नसतं. म्हणून सफल काव्यानुवादामध्ये तुल्यार्थकता प्रमुख्य ध्येय ठेवून शैली व लक्ष्यभाषेची स्वाभाविकता अधिकाधिक जपण्याचा प्रयत्न केला जातो.

चांगल्या अनुवादात एकाच वेळी अर्थ, शैली व प्रभाव यांच्या दृष्टीने समांतर जाणारी स्थळे किती आहेत हे महत्त्वाचे ठरते. या अनुवादात अशी बरीच स्थळे दाखवता येतील. वानगीदाखल एक-दोन पाहू.

| | |
|---|---|
| ● कॉलेज के परिचय पत्र से | कॉलेजच्या ओळखपत्रातून |
| खींचकर निकाला गया | फाडून काढून घेतलेला |
| मासूम चेहरेवाला | निरागस चेहऱ्याचा |
| एक श्वेत-श्याम फोटो | एक ब्लॅक ॲण्ड व्हाइट फोटो |



अनुक्रमणिका

| | |
|---|---|
| ● और तो ठीक है चलो मान लिया | असो, चल कबूल की |
| दिनभर आज तुम परेशान रहीं | आज दिवसभर तू वैतागली होतीस |
| मगर यह तो बताओ | पण हे तर सांग |
| उसने टेलीफोन पर तुमसे कहा क्या-क्या | तो तुला फोनवर म्हणाला तरी काय |

शब्दांच्या निवडीमध्ये नेमका अर्थ व मराठीचा स्वाभाविक बाज जपणारी अनेक उदाहरणे आहेत. त्यांतील काही अशी आहेत -

- बदलासा था - बदलल्यासारखा वाटत होता.

हाथ छुडा भी न पाएँ मुझसे - हात सोडवणं मुश्किल होईल

कच्ची उम्र - अल्लड वय, बनूनी - लीलया, बढना - आगेकूच, तमाम प्रयत्नों के बाद - लाख प्रयत्न करूनही दिक्कत - अबदा, बहुत - लई (मोलकरणीच्या अनुभव संदर्भासाठी)

अनुवादकाने अनुवादात काही शब्दांची भर घातली आहे :

पहली बार - अगदी पहिल्यांदा, पत्रों के मामले में - पत्रांच्या बाबतीत मात्र, मजा तो तब आता है - खरी गंमत तर तेव्हा येते, धूप खिली हुई थी - चक्क ऊन्ह पडलं होतं, गेंदा हो गयी हूँ - मोठ्ठा चेंडू झाले आहे मी इ०. या सर्व ठिकाणी अर्थाला वेगळे वजन येऊन भाषा मराठी वाचकाशी एक जवळीक निर्माण करते.

- काही ठिकाणी, यार हम भी उतने बुरे नहीं, रंगे हाथ, खुले आम, चलता है यार, मेडिकल रिपोर्ट, ब्लॅक अॅण्ड व्हाइट फोटो, गेस करतो, असे हिंदी व इंग्रजीतील शब्द वा वाक्यांश वापरून भाषेला व खास करून संवादांना व्यावहारिक सहजता देण्याचा प्रयत्न केलेला दिसतो.

- उसके अंदर - तिच्याआत, मेरे भीतर - माझ्याआत, मौन बिखरता - मौन पसरते, उसके भीतर पल रहे एहसास - तिच्याआत जन्मणाऱ्या त्या अनुभवाला. असे काही मराठीत न खपणारे शब्दही आले आहेत, पण त्यांतील काही अपरिहार्यतेतून आलेले आहेत व काही टाळता आले असते असे आहेत.

मूळ आशय जसाच्या तसा पोहोचवण्यासाठी अनुवादरूपाने रूपांतरण प्रक्रियेचा आधारही घेतलेला दिसतो.

- बेटी की खूबसूरती चुमती हुई है - मुलीचे सौंदर्य लोकांच्या नजरेत भरणारे आहे.

दर किनार करके - दुधातल्या माशीसारखं दूर करून

मैं किसी के मन की थोडे ही जानता हूँ - मी काय मनकवडा आहे?

कहीं - न कहीं कुछ है - काहीतरी बिनसलंय इ०

याशिवाय वाक्यातील शब्दाचे स्थान, वाक्याची रचना, वाक्यांचा क्रम अशा सर्व स्तरांवर केलेल्या बदलांची संख्या इतकी आहे की ती उद्धृत करणं शक्यही नाही व गरजेचेही नाही. त्या सर्वांचे परीक्षण केल्यावर प्रामुख्याने जाणवणाऱ्या दोन बाबी अशा आहेत.

- बहुस्तरीय बदलांनी मूळ काव्यातील, ध्वनिसंगती, अंतर्गत लय व शैली बदलली तरी अर्थाला बाध येत नाही व कविता वाचकाला भावते.

| | |
|---|---|
| ● समय ढलती सांझ का है - | ● संध्याकाळची वेळ |
| ● उनसे करती है<br>बेरों की भाषा में<br>खट्टी-मीठी बातें | ● मारते गप्पा त्यांच्याशी<br>बोरांच्या भाषेत<br>आंबट - गोड |
| ● लेकिन वह हर बार उसे<br>मित्रों के हाथों में जान से<br>बचा लेता है । | ● पण कधीच तो फोटो<br>मित्रांच्या हाती लागू देत नाही |
| ● या कि इस तरह मिलूँ<br>जैसे बीच राह में टूटी<br>तुम्हारी चप्पल के लिए<br>बहुत जरूरी पिन | ● की भेटू नेमकं<br>रस्त्यातच तुटलेल्या<br>तुझ्या चप्पलसाठी<br>अचानक गवसलेल्या पिनसारखा |
| ● उसे इस बात का कतई पता नहीं<br>हम उसके साथ कितनी बार<br>कल्पनाओं और सपनों के<br>चिर-युवा बिस्तर पर कर चुके हैं<br>सहवास | ● तिला तर या गोष्टीची खबरच नाही<br>की कल्पना व स्वरांच्या चिरतरुण<br>बिछान्यात कितीतरी वेळा केला<br>आहे आम्ही सहवास तिच्यासोबत<br>संभोग |

- याउलट भाषेच्या सीमांमुळे कराव्या लागलेल्या बदलांमुळे अर्थाला बाध आली नाही तरी काव्यलयीत न्यूनता आल्याचीही काही उदाहरणं दाखवता येतील.

● चौदह की तुम और अठारह के मेरे बीच

- चौदा वर्षांची तू आणि अठराचा मी अशा दोघांच्यातला

● जरूरी नहीं हम अपनी बातों में आपको करें ही शामील

- आमच्या गप्पांमध्ये आम्ही तुम्हाला सामील करून घ्यावंच अशी गरज नाही.

● न ही कोई अपराध बोध मेरे भीतर
- आणि अपराध्यासारखंही वाटत नाही मला.
● मेरी एक-एक अदा पर मर मिटने को तत्पर
- म्हणायचीस जीव द्यावा अशी आहे तुझी एक - एक अदा
('जीव द्यावा'च्याऐवजी 'जीव ओवाळून टाकावा' जास्त योग्य)

या व अशासारख्या इतर काही ठिकाणी हिंदी भाषेचं लाघव किंवा सौष्ठव मराठीत आणणं शक्य न झाल्याने भाषा गद्याच्या एकरेखीय लयीत गेल्याचे जाणवते.

शेवटी अर्थाच्या दृष्टीने खटकणाऱ्या काही मोजक्या संदर्भांचा उल्लेख करावा लागेल.

● 'माझं अजूनही तिच्यावर प्रेम नाही' या कवितेत हिंदीतील 'अंतरंगता' या शब्दासाठी 'अंतरंग' शब्द वापरल्यामुळे व पुढील ओळींचा अनुवाद केवळ शब्दानुवाद झाल्याने संपूर्ण संदर्भातील अमूर्त भावछटा व्यक्त करण्यात कमी पडतो.

● शब्दार्थ व शब्द-प्रयोगातील भ्रामक आणि अनवधानाने आलेले चुकीचे संदर्भ क्वचित कुठे-कुठे दिसतात. जसे-

'लकदक'साठी लखडलंय      'दौडते समय'साठी धावडवताना
'अनछुई'साठी अस्पृष्ट      'रंगीत'साठी रंगेल
'जाँचा-परखा'साठी निवडलेला-परखलेला शब्द वापरले आहेत.

अलावासाठी ऐवजी,
'बोलेबिना'साठी बोलवल्याशिवाय;
'असेल तुझ्या हाती साथी'साठी नसेल तुझ्या हाती
'ज्या डोळ्यांच्या'साठी ज्या शेणांच्या - शब्द आले आहेत. हे दोष जाऊ शकतात.

या काही क्षुल्लक कमतरता वगळता संपूर्ण अनुवादाचा विचार केल्यावर हा अनुवाद सफल (चांगला) मानावा लागेल. आजच्या वास्तवाकडे व एकूण मानवी वर्तनाकडे पाहण्याची वेगळी दृष्टी देणाऱ्या या कविता आवर्जून वाचाव्यात अशा आहेत.

■

हिंदी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे 411 007
भ्रमणभाष : 098508 11245

# अनाग्रही सर्वसमावेशक संशोधन

सुबोध जावडेकर

(परीक्षित पुस्तक : 'ध्वनितांचें केर्णे' - मा०ना० आचार्य. पद्मगंधा प्रकाशन, पुणे. २००८. पृष्ठे २७८. किंमत रु० २५०/-)

'ध्वनितांचें केर्णे' हे पुस्तकाचे नाव आपल्याला कोड्यात टाकतं. ध्वनित म्हणजे जे उघड नाही ते, आडवळणानं सांगितलेलं, हे आपल्याला माहीत असतं. तेव्हा ध्वनित म्हणजे सूचित किंवा गुह्य असणार. पण 'केर्णे' म्हणजे काय बुवा? असा प्रश्न बहुतेकांच्या चेहऱ्यावर उमटेल. केर्णे म्हणजे गाठोडं. 'ध्वनितांचें केर्णे' म्हणजे गूढार्थाचं गाठोडं. हा ज्ञानेश्वरीतला शब्दप्रयोग आहे. एखाद्या गोष्टीला वरवर दिसतो त्यापेक्षा काहीतरी खोल अर्थ दडलेला असतो अशा वेळी हा शब्दप्रयोग वापरतात. प्राचीन साहित्यामध्ये आणि संतवाङ्मयामध्ये अशा अनेक जागा आहेत की ज्यांमध्ये वरकरणी दिसतं त्यापेक्षा काहीतरी वेगळंच लेखकाला सांगायचं असते. अशा जागा नेमक्या हेरून मा०ना० आचार्यांनी हे गूढार्थाचं गाठोडं आपल्यासमोर सोडलेलं आहे.

मा०ना० आचार्य यांचा देवकथांचा, पुराणकथांचा, मिथकांचा दांडगा अभ्यास आहे. मराठी, इंग्रजी, हिंदी, संस्कृत या भाषांतील साहित्याचं त्यांचं भरपूर वाचन आहे. याचे पुरावे पुस्तकात जागोजागी विखुरलेले आहेत. प्राचीन भारतीय वाङ्मय, वेदपुराणे, रामायण-महाभारतासारखी महाकाव्ये, संतसाहित्य, याच्याबरोबरीनं आधुनिक साहित्य आणि समीक्षा या सर्व क्षेत्रांत त्यांचा सहज संचार चालू असतो. त्यांच्या या चतुरस्र व्यासंगाला सुरेख ललितशैलीची जोड मिळाल्यामुळे या पुस्तकाला रूढ समीक्षाग्रंथाचं स्वरूप न येता काव्यशास्त्रविनोदाच्या सुरेल मैफलीचं रूपडं आलं आहे.

एखाद्या गोष्टीकडे बघताना वेगवेगळ्या कोनांतून त्याच्यावर प्रकाश टाकायची आचार्यांना आवड आहे हे तर पुस्तक वाचताना सहजच लक्षात येतं. ज्याबद्दल लिहायचं त्याच्या संदर्भात जास्तीत जास्त माहिती मिळवून ती वाचकांपुढे सादर करण्याकडे त्यांचा कटाक्ष असतो. पण हे करताना केवळ संदर्भांचा ढीग वाचकाच्या पुढ्यात ओतून त्याला चकित करावं, त्याचं डोकं भिरभिरवून टाकावं, असा त्यांचा

उद्देश नसतो. तर एकाच विषयाचे अनेकविध पैलू दाखवून वाचकाला त्या विषयाचा सर्वांगानं परिचय करून देण्यावर त्यांचा भर असतो.

पण मला जाणवलेलं या पुस्तकाचं सर्वांत विलोभनीय वैशिष्ट्य म्हणजे लेखकाची अनाग्रही, सर्वसमावेशक भूमिका. एखाद्या घटनेचा किंवा कथेचा स्वत:ला जाणवलेला अन्वयार्थ सांगताना केवळ आपलीच बाजू खरी आणि इतरांची चुकीची असा दुराग्रह आचार्य मुळीच धरत नाहीत. उलट आपण सांगितल्यापेक्षा वेगळा अर्थ लावणारा संदर्भ कुठे सापडला तर त्याचा आवर्जून उल्लेख करायला ते बिचकत नाहीत. पुष्कळ पुस्तकांत असं लक्षात येतं की लेखकानं एक कुठलंतरी प्रमेय स्वीकारलेलं असतं. आणि मग स्वत:च्या दृष्टिकोनाच्या समर्थनार्थ आपल्या बाजूचे पुरावे, आपल्या गृहिताला पुष्टी देणाऱ्या गोष्टी, इतरांचे आपल्या भूमिकेला पाठिंबा देणारे अभिप्राय यांच्या याद्यांच्या याद्या तो लेखक पुस्तकातून सादर करत असतो. 'हा जय नावाचा इतिहास आहे', 'कर्ण खरा कोण होता?' अशी काही सहज आठवणारी उदाहरणे.

मा०ना० आचार्य यांनी मात्र कुठल्याच मुद्द्याच्या संदर्भात अशी बनचुकी भूमिका घेतलेली नाही. एखाद्या गोष्टीच्या अनुषंगाने जेवढे म्हणून उलटसुलट मुद्दे त्यांना आढळले ते सगळेच्या सगळे, काहीही न लपवता, कुठलीही संपादकीय कात्री न लावता, त्यांनी वाचकांच्या समोर ठेवले आहेत. पूर्वसूरींच्याबरोबरीनं समकालीन अभ्यासकांच्या मतांचीही चर्चा केली आहे. सर्व मुद्दे वाचकांसमोर यावेत आणि मग वाचकाने स्वत:च काय तो निष्कर्ष काढावा अशी त्यांची प्रामाणिक इच्छा आहे हे पुस्तक वाचताना सतत जाणवत राहतं. त्यांची भूमिका सच्च्या अभ्यासकाची आहे. विनम्र आणि काहीशी तटस्थ. कुठलाही अभिनिवेश नाही. चलाखी नाही. किंवा डावपेच नाहीत. पूर्वग्रहाचा किंवा अहंकाराचा वारासुद्धा त्यांना कुठं स्पर्शून गेलेला नाही. अशा स्वरूपाचे पुस्तक लिहिताना लेखकाची भूमिका कशी असावी याचा हा वस्तुपाठ आहे.

पुस्तकाच्या पहिल्या भागाला त्यांनी 'भरती' हे नाव दिलंय. या विभागातल्या पाच लेखांत केंद्रीभूत विषयाच्या अनुषंगाने इतरही भरपूर माहिती त्यांनी दिली आहे. गणेश ही देवता, श्रीकृष्ण ही व्यक्ती, अश्वत्थ हा वृक्ष, खेचर ही भूतयोनीसारखी योनी आणि संत नामदेवांचं त्यांच्या अभंगांतून दिसणारं व्यक्तिमत्त्व असे हे पाच विषय आहेत. विषयांची ही केवळ यादी वाचूनच आपण थक्क होतो. किती नानाविध विषय आचार्यांना दिसतात आणि त्यावर लिहिताना ते किती रंगून जातात हे पाहायला मुळातून पुस्तकच वाचायला हवं.

दुसऱ्या 'झडती' या भागामध्ये मान्यवर संशोधकांनी कळत नकळत

केलेल्या प्रमादांची झाडाझडती घेतलेली आहे. विवेचनाच्या ओघात डॉ० हे०वि० इनामदार, मंगरूळकर, केळकर, राजवाडे, दांडेकर, न०म० सोमण, गो०म० कुलकर्णी, दुर्गा भागवत, ना०गो० नांदापुरकर, सातवळेकर, स्वामी स्वरूपानंद अशा अनेक विद्वानांच्या मतमतांतराचा धांडोळा त्यांनी इथं घेतलेला आहे. अभंग, ओव्या, भारूड, भागवत, पुराणं, असा त्यांच्या अभ्यासाचा विस्तृत प्रदेश आहे. ज्या ज्या ठिकाणी काही चुकीचे अर्थ लावले गेले आहेत, विचार न करता काहीतरी ठोकून दिलं आहे, त्याचं पुरेपूर माप त्यांनी त्या त्या संशोधकाच्या पदरात घातलं आहे. 'व्यासपर्वाचा पैस' या मोठ्या लेखात दुर्गाबाईंच्या ललितरम्य भाषेला, अभिजात रसिकतेला, जीवनातलं नाट्य नेमकेपणानं टिपणाऱ्या प्रतिभेला दाद देतानाच दुर्गाबाईंनी केलेले घोटाळे, गफलती, वाचकांची वंचना यावर कठोर टीकाही केली आहे.

तिसऱ्या 'फिरती' या भागात तीन लेख आहेत. त्यात अहल्या, एकलव्य आणि पुरुरवा यांच्या मूळ कथेत, आणि त्यामुळे अर्थातच आशयात, झालेल्या बदलांचा मागोवा त्यांनी त्यांच्या शैलीत घेतला आहे. तो घेताना केवळ प्राचीन कवींचीच नाही तर विंदा करंदीकर आणि पु०शि० रेगे यांच्यासारख्या अर्वाचीन कवींचीही साक्ष त्यांनी काढलेली आहे. हे लेख लिहिताना त्यांनी केलेली काटेकोर मांडणी बघण्यासारखी आहे.

आचार्यांची भूमिका नम्र असली तरी कुठंही बोटचेपी, गुळमुळीत झालेली नाही. पहिल्या भागात तर अशा काही जागा आहेत की ज्यांच्याबद्दल लिहिताना त्यांना देवदेवतांबद्दल धीट शब्दात लिहावं लागलं आहे. एवढ्यातेवढ्यावरून भावना दुखावल्या जाणाऱ्या आजच्या युगात अशा नाजूक जागांबद्दल लिहिणं म्हणजे तारेवरची कसरतच आहे. ती त्यांनी कशी साधली आहे ते बघण्यासाठी 'देवा तू चि गणेशु' या लेखातल्या गणेशजन्माची कथा मुद्दाम डोळ्याखालून घालावी.

पुराणग्रंथांचा अभ्यास असला तरी आचार्यांची मनोधारणा अजिबात पारंपरिक, पुराणमतवादी, कोती नाही. उलट ती खरोखरीची उदारमतवादी, कित्येकदा तर प्रखर स्त्रीवादीही आहे हे लक्षात येतं. आपल्या प्राचीन धर्मग्रंथामध्ये स्त्रीच्या मुक्त वासनांचा आविष्कार अनेकदा मोकळेपणाने व्यक्त झाला आहे. स्त्रीच्या या आदिम कामभावाबद्दल लिहिताना आचार्यांची लेखणी कुठं अडखळल्याचं जाणवत नाही. द्रौपदी, अहल्या, लोपामुद्रा, यमी यांच्या चित्रणात हे प्रकर्षानं दिसून येतं. आनंदरामायणामध्ये आलेल्या पिंगलेच्या कथेत रामाला वसिष्ठांच्या पायांवर हात ठेवून शपथ घ्यावी लागते व सीतेला आपल्या शुद्धतेची खात्री पटवावी लागते हा भागही गमतीचा आहे. 'अहल्या शिळा...'

हा लेख तर फारच सुरेख जमला आहे. त्यात ऋग्वेदापासून थेट विंदा करंदीकरांपर्यंत अनेकांनी अहल्येच्या कथेकडे कसं पाहिलं आहे याचा विचक्षणपणे आढावा घेतला आहे.

विनोद हा अभ्यासू वृत्तीला मारक असतो असा गैरसमज, का कुणास ठाऊक, आपल्याकडे प्रचलित आहे. अत्यंत गांभीर्याने केलेलं लिखाणसुद्धा काडेचिराईताचा काढा पिऊन करायची आवश्यकता नसते. अधूनमधून कोपरखळ्या, थट्टामस्करी, अवखळपणा असला तरी विषयाच्या गांभीर्याला मुळीच बाधा येत नाही अशी आचार्यांची धारणा आहे. 'अहल्या शिळा...' या लेखाच्या सुरुवातीला दिलेल्या 'अपौरुषेय(!)' ओळी आणि त्या चुटक्यानं लेखाची सुरुवात करायची कल्पना तर अफलातूनच आहे. अशा प्रसन्न शैलीमुळे पुस्तकाची वाचनीयता कितीतरी पटीनं वाढली आहे यात शंका नाही.

पुस्तकाचं मुखपृष्ठ रविमुकुल यांचं आहे; त्याचा मुद्दाम उल्लेख करायला हवा. पिवळ्या पडलेल्या कागदावर जुन्या पोथ्यांत असतात तशी. बोरूने रेखलेली, फिकट होत चाललेली, ढबोळी अक्षरं आणि त्यांच्या पार्श्वभूमीवर 'ध्वनिताचें केणें' असं काळ्याभोर ठसठशीत अक्षरात ग्रंथाचं नाव, पुस्तकाचं स्वरूप आणि लेखकाची भूमिका याबद्दल बरंच सांगून जातं.

आचार्यांचं हे पुस्तक वाचताना त्यांची शैली, अभ्यास, भाषा, प्रतिभा, संदर्भसंपन्नता यांबाबतीत 'युगान्त' ह्या इरावती कर्व्यांच्या पुस्तकाची वारंवार आठवण होते. कोणत्याही पुस्तकाचा यापेक्षा जास्त गौरव कुठल्या शब्दांत करता येईल?

■

5, भागीरथी प्रसाद, 99 शिवाजी पार्क, दादर, मुंबई 400 028
दूरभाष : (022) 2446 6451
भ्रमणभाष : 09870369372
ई-मेल : subodh.jawadekar@hotmail.com



अनुक्रमणिका

# आरपार लयीत प्राणांतिक

**नीलिमा गुंडी**

('आरपार लयीत प्राणांतिक' - प्रज्ञा दया पवार. लोकवाङ्मयगृह, मुंबई. २००९. पृष्ठे ५५. मूल्य रु० ६०/-)

कवयित्री प्रज्ञा पवार यांची 'आरपार लयीत प्राणांतिक' ही दीर्घकविता विठाबाई भाऊ मांग नारायणगावकर या लावणीसम्राज्ञीच्या जगण्याचे सारसर्वस्व शब्दांकित करण्याचा प्रयत्न करते. काव्यविषय झालेल्या विठाबाईंशी पुस्तकाच्या सुरुवातीला साधलेल्या मनोगतसदृश संवादातून कवयित्रीची लेखनामागची भूमिका लक्षात येते. संस्कृतीचा पोट-संस्कृतीशी अन्वय लावणे, तसेच जातिव्यवस्थेतल्या उतरंडीत सर्वात पायतळी ढकलल्या गेलेल्या बाईची जिद्द आणि कलेची ताकद जाणवून देणे, ही दलित-स्त्रीवादी भूमिका त्यामागे आहे. डॉ० माया पंडित यांनी 'निमित्ताने' या प्रस्तावनेतून दलित-कष्टकरी स्त्रीच्या सांस्कृतिक संघर्षाची वाचकांना जाणीव करून दिली आहे.

'पवळा हिवरगावकर ते विठाबाई भाऊ मांग नारायणगावकर,' तसेच 'लावणीसम्राज्ञी ते जोगवा मागणारी असहाय स्त्री' या विठाबाईंच्या दंतकथासदृश जीवनप्रवासाचे - त्यातील चढउताराचे - दर्शन या दीर्घकवितेतून प्रभावीपणे घडते. पुरुषसत्ताक मनोवृत्तीची दांभिकताही त्यातून उजेडात येते. विठाबाईंविषयीची कवयित्रीची सहसंवेदना यात विविध नात्यांनी घट्ट विणली गेली आहे. स्त्री, दलित आणि कलावंत या तीनही पातळ्यांवर कवयित्रीला विठाबाईंशी नाते जोडता आल्यामुळे विठाबाईंची व्यक्तिरेखा यात विविध परिमाणांतून साकार झाली आहे.

कवयित्रीने मार्मिक प्रतिमांच्या द्वारे विठाबाईंच्या अभावग्रस्त जगण्याचे शोकात्म रूप आणि कलासंपन्न जगण्याचे दिमाखदार रूप यातील अंतर्विरोध सूचित केला आहे. ''बाई असण्याच्या चिरंतन ढोलकाठीचा खेळ', 'अभावाची ढोलकी', 'भुकेचा आदिम वग', 'षड्विकारांची ओटी' ही यातील रूपके अर्थगर्भ आहेत. ही दीर्घकविता भावकवितेच्या अंगाने विकसित होते. त्यामुळे यात वर्णन-निवेदन यांना फाटा देऊन भावना-संवेदना-चिंतन यांच्या आवेगातून

आलेला प्रवाहीपणा जाणवतो. शीर्षकातूनही याचा प्रत्यय येतो. यातील चिंतन स्त्रीत्व आणि दलितत्व यांच्याशी निगडित शोषणापुरतेच मर्यादित नसून नवभांडवलशाहीच्या नावाखाली लावणीकलाकारांची होणारी लैंगिक लूटही लक्षात आणून देणारे आहे.

''नवजात अर्भकाला जन्म देऊन,
दगडानं त्याची नाळ ठेचून,
पुन्हा फडावर रंगबाजी करताना,
तुझ्या मायांगातून ओघळणारा घाम,

वेदना अशी कापत जाते
'माझ्या संज्ञेला''

अशा यातील ओळी उत्कट आहेत आणि धारदार उपरोधामुळे जिव्हारी झोंबणाऱ्याही आहेत.

कवयित्री आणि विठाबाई यांच्या सहसंवेदनेच्या नात्यावर उभ्या राहिलेल्या या दीर्घकवितेचा बाज लयबद्ध तर आहेच, शिवाय आशयगर्भही आहे.

■

neelima.gundi@gmail.com

**पोटभाषा - मध्यवर्ती भाषा**

उत्पत्तीच्या बाबतीत कधी कधी मध्यवर्ती भाषाच एखाद्या पोटभाषेपासून निघालेली सापडते. पोटभाषांचा गौणपणा काढून टाकून त्यांना महत्त्व प्राप्त करून देणे हे बोलणाऱ्यांच्या ताब्यातील आहे. पोटभाषांत सकस व सरस असे वाङ्मय निर्माण झाल्यानंतर तिला कमी कोण लेखणार? तिच्यामध्ये जर जाज्वल्य व स्वतंत्र स्वरूपाचा व्यवहार सुरू केला, तिच्या द्वारा जर शास्त्रांचा प्रसार झाला, तर तीच पोटभाषा आदर्श मध्यवर्ती मुख्य भाषाच का होऊ शकणार नाही?

-कृ०पां० कुलकर्णी
*'मराठी भाषा - उद्गम व विकास'* मधून

# 'बंगलो'

**अलका कानेटकर**

'भाषा आणि जीवन' (उन्हाळा २००९)च्या अंकातील 'शब्दजिज्ञासा'मधल्या ब्रह्मानंद देशपांडे यांचा 'बंगला' हा लेख वाचला. बंगला या शब्दाच्या व्युत्पत्तीसंबंधी त्यांनी चांगली माहिती दिली आहे.

इथे दोन संदर्भग्रंथांची आठवण होते. इंग्रजांच्या काळात बरेच भारतीय शब्द इंग्रजीत वापरले गेले. त्या शब्दांबद्दल माहिती देणारे दोन शब्दकोश म्हणजे जॉर्ज क्लिफर्ड व्हिटवर्थ यांचा 'अँग्लो-इंडियन शब्दकोश' आणि हॉब्सन-जॉब्सन 'अँग्लो-इंडियन शब्दकोश'. या दोन्ही कोशांमध्ये इंग्रजी 'बंगलो' या शब्दाबद्दल खालीलप्रमाणे माहिती दिलेली आहे.

व्हिटवर्थच्या शब्दकोशात इंग्रजीमधला 'बंगलो' हा शब्द बंगालच्या बांग्लाचा अपभ्रंश असल्याचं म्हटलं आहे. बंगलो म्हणजे वाळलेल्या गवताच्या छपराचं एकमजली घर किंवा जमिनीवर स्वतंत्रपणे उभं असलेले कोणतेही घर, असं म्हटलं आहे.

हॉब्सन-जॉब्सन शब्दकोशात 'बंगलो' या इंग्रजी शब्दाचं 'एकमजली कौलारू घर' असं स्पष्टीकरण दिलेलं आहे. बंगल्याबद्दलचं किंवा बंगालचं काहीतरी ते बांग्ला असं पूर्वी हिंदुस्थानात म्हटलं जाई. त्यामुळे युरोपियनांनी बंगालसारखी घरं इतरत्र बांधली, तेव्हा त्याला बंगला, बंगाली पद्धतीचे घर अशी नावे दिली. इंग्रजी 'बंगलो' ही संज्ञा बंगालमधील युरोपियनांनी स्थानिक घरांच्या पद्धतीवरून घेतली असल्याचं हॉब्सन-जॉब्सन शब्दकोशात म्हटलं आहे.

या दोन्ही कोशांबद्दल आणखी थोडी माहिती देते. व्हिटवर्थ यांचा शब्दकोश केगन पॉल, ट्रेंच आणि कंपनी, लंडन यांनी १८८५ मध्ये प्रकाशित केला आणि १९७६ साली इंडिया डॉक्युमेंटेशन सर्व्हिस, गुरगाव यांनी पुनर्मुद्रित केला. त्या वेळी वापरात असलेले आणि भारतीय संदर्भात विशिष्ट अर्थ असलेले पण नेहमीच्या इंग्रजी किंवा भारतीय शब्दकोशांत स्पष्टीकरण नसलेले शब्द व संज्ञा या व्हिटवर्थच्या शब्दकोशात घेतलेल्या आहेत. कलम, कच्चा, पिठोरी, लाख, कडिया इ० अशा जवळजवळ ५ हजारापर्यंत शब्दांची व्युत्पत्ती किंवा भारतीय संदर्भ त्यात दिलेले आहेत. ३५० पानांचा हा शब्दकोश संशोधकांसाठी आणि

भारतीय इतिहास व संस्कृती यांमध्ये रुची असणाऱ्यांसाठी उत्तम संदर्भग्रंथ आहे.

हॉब्सन-जॉब्सन अँग्लो इंडियन शब्दकोश हा हेन्री यूल व ए०सी० बर्नेल यांनी तयार केला आहे. १९०३ मध्ये लंडनच्या जॉन मरे यांनी मूलत: प्रकाशित केलेल्या ह्या कोशाचं दुसरं पुनर्मुद्रण नवी दिल्लीच्या एशियन एज्युकेशनल सर्व्हिसेसने २००६ साली केलं आहे. यामध्येही अचार, बझार, घी, लोटा, फकीर, झुला इ० इ० सारखे जवळजवळ ५ हजारांपर्यंत शब्द आहेत. शिवाय शब्द पटकन सापडण्यासाठी तीस पानांची शब्दसूची शेवटी दिलेली आहे. तसेच या कोशात ज्या ज्या पुस्तकांचे संदर्भ आले आहेत, त्या त्या पुस्तकांची पूर्ण नावे असलेली २० पानी एक यादीही दिलेली आहे: जिज्ञासूंनी या पुस्तकाची प्रस्तावना वाचल्यास या एक हजार पानी पुस्तकाच्या आवाक्याबद्दल अधिक माहिती मिळेल.

व्हिटवर्थचा शब्दकोश आणि हॉब्सन-जॉब्सन शब्दकोश हे दोन्ही संदर्भग्रंथ मुंबई विद्यापीठाच्या विद्यानगरी परिसरातील जवाहरलाल नेहरू ग्रंथालयात संदर्भासाठी उपलब्ध आहेत.

■

302, तनुजा सोसायटी, प्रेमनगर, खारेगाव, कळवा (पश्चिम) 400 605
दूरभाष : (022) 2537 2672
भ्रमणभाष : 099694 45097

**परीक्षणासाठी आलेली पुस्तके**

- **'आरपार लयीत प्राणांतिक'** (दीर्घकविता) - प्रज्ञा दया पवार. लोकवाङ्मयगृह, मुंबई. २००९. पृष्ठे ५५, मूल्य रु० ६०-/
- **कविता : भाषा व परिसर** - डॉ० शिवाजी पाटील. रजत प्रकाशन, औरंगाबाद. २००८. पृष्ठे १०३. किंमत रु० १००-/
- **आम्ही भावंडं** - संपा० आशा गुर्जर. गायत्री साहित्य, पुणे. २००९. पृष्ठे १९४. किंमत रु० १५०-/
- **भाषा : विचार, वर्तन आणि अध्यापन** - डॉ० विद्यागौरी टिळक. सुविद्या प्रकाशन, पुणे. २००९. पृष्ठे १११. किंमत रु० १००-/
- **प्रकाशवाट** - (तेलुगू - व्होल्गा, इंग्रजी - अल्लादि उमा व एन० श्रीधर) अनुवादक - वंदना करंबेळकर. ग्रंथाली. मुंबई. २००९. पृष्ठे १३४. किंमत रु० १२५-/



अनुक्रमणिका

# परिषद-वार्ता

१. मराठी अभ्यास परिषदेची १३वी वार्षिक सर्वसाधारण सभा १२ जुलै २००९ रोजी मुलांचे भावे विद्यालय, पेरूगेट, पुणे येथे झाली. अध्यक्षस्थानी प्रा० प्र०ना० परांजपे होते. सभेला ५२ सभासद उपस्थित होते. प्रारंभी २००८-२००९ या वर्षांतील दिवंगतांना श्रद्धांजली वाहण्यात आली. चिटणीस प्रा० आनंद काटीकर यांनी २००८-०९ या वर्षाचे कार्यवृत्त सादर केले. कोषाध्यक्ष श्रीमती विजया चौधरी यांनी लेखापरीक्षकांच्या अहवालासह वार्षिक ताळेबंद व पुढील वर्षाचे अंदाजपत्रक सादर केले. पुढील वर्षासाठी लेखापरीक्षकांची व कायदेविषयक सल्लागारांची नेमणूक करण्याबद्दलचा प्रस्ताव संमत करण्यात आला. तरुण मराठी भाषकांमध्ये मराठीबद्दल आस्था निर्माण करण्याची व त्यांना संस्थेकडे आकर्षित करण्याची आवश्यकता असल्याचे प्रा० परांजपे यांनी सांगितले. त्यासाठी 'भाषा आणि जीवन'च्या वार्षिक वर्गणीत विद्यार्थ्यांना सवलत देण्याची कल्पना मांडली. त्यांच्यासाठी स्वतंत्र व्याख्याने व चर्चासत्रे आयोजित करणे, स्पर्धा घेणे इत्यादि सूचनाही करण्यात आल्या. त्याबद्दल कार्यकारिणीने निर्णय घ्यावा असे ठरले. शेवटी अध्यक्षांचे आभार मानून सभेचा समारोप झाला.

२. संस्थेच्या आवाहनाला प्रतिसाद देऊन पुढील आजीव सभासदांनी आपली उर्वरित वर्गणी (किंवा अधिक रक्कम) पाठवली. संस्था त्यांची आभारी आहे : सर्वश्री ब०के० काळे (पुणे), बा०ग० भाटवडेकर (बडोदे), श्रीनिवास पंडित (मुंबई), माधव ना० आचार्य (चौल), बाबा भांड (औरंगाबाद), दीपक घारे (डोंबिवली), जाई निंबकर (फलटण), चंद्रकांत मर्गज (मुंबई), म०सु० पाटील (मुंबई)

३. परिषदेला देणग्या : परिषदेला पुढील व्यक्तींनी दिलेल्या देणग्यांबद्दल परिषद त्यांची ऋणी आहे.

श्रीमती लीला पाटील : रु० ४०००/-
श्रीमती रमा राऊळ : रु० ३९००/-
(परिषदेला दिलेल्या देणग्यांना आयकरातून सूट मिळते.)

४. चुकीची दुरुस्ती : 'भाषा आणि जीवन'च्या २७-३ (पावसाळा ०९) अंकात पृष्ठ ५वरील चौकटीच्या शीर्षकात 'अस्मिता'ऐवजी 'अस्तिमा' असा मुद्रणदोष राहून गेला आहे. क्षमस्व.

■

**लेखक परिचय**

- उमाकांत रामचंद्र **कामत :** एम०ए०,एम०एड०. अलिबाग, मालेगाव, पालघर येथील महाविद्यालयांत मराठी, शिक्षणशास्त्र, मानसशास्त्र या विषयांचे अध्यापन. चार पुस्तके प्रकाशित.

- डॉ० सोनल **कुलकर्णी-जोशी :** डेक्कन कॉलेजमधून भाषाविज्ञानात एम०ए०, रेडिंग विद्यापीठ (इंग्लंड) येथून पीएच०डी०. सध्या डेक्कन कॉलेजात भाषाविज्ञानाच्या प्रपाठक.

- डॉ० नीलिमा **गुंडी :** स०प०महाविद्यालय (पुणे) येथे मराठीचे अध्यापन. 'आभाळाचा फळा' व 'कानामात्रा' या दोन बालकवितासंग्रहांना महाराष्ट्र शासनाचे पुरस्कार. 'प्रकाशाचे अंग' या काव्यसंग्रहाला इचलकरंजीच्या आपटे वाचनमंदिराचा पुरस्कार. 'कविता विसाव्या शतकाची'च्या सहसंपादक.

- सुबोध **जावडेकर** : बी०टेक० (रासायनिक अभियांत्रिकी). निवृत्त. 'आकांत' ही कादंबरी. चार विज्ञानकथासंग्रहांसह एकूण १३ पुस्तके प्रकाशित. महाराष्ट्र शासनाची तीन पारितोषिके, कोठावळे पारितोषिक व इतर सहा पारितोषिके.

- डॉ० बलवंत **जेऊरकर** : पुणे विद्यापीठातून हिंदी विषयात एम०ए०, एम०फिल०, पीएच०डी०, विलिंग्डन महाविद्यालय, सांगली येथे अधिव्याख्याता. 'अनुवाद : समस्याएँ और संदर्भ' ह्या पुस्तकाचे संपादन. मंगेश डबराल ह्यांच्या साहित्य अकादमीचा पुरस्कार मिळालेल्या 'हम जो देखते हैं' ह्या कवितासंग्रहाचा मराठी अनुवाद साहित्य अकादमीकडून प्रकाशित. पवन करण ह्यांच्या 'स्त्री मेरे भीतर'चा मराठी अनुवाद शब्द प्रकाशनाकडून प्रकाशित. राजेश जोशी ह्यांच्या कवितासंग्रहाचा अनुवाद प्रकाशनाच्या मार्गावर.

- डॉ० ब्रह्मानंद **देशपांडे :** महामहोपाध्याय, विद्याभूषण. प्राचीन मराठी वाङ्मयाचे व्यासंगी संशोधक. 'देवगिरीचे यादव', 'शोधमुद्रा' इ० पुस्तके प्रकाशित.

- डॉ० जया **परांजपे :** एम०ए०,पीएच०डी०. पुणे विद्यापीठाच्या हिंदी विभागात प्रपाठक. हिंदी नाटकावर दोन पुस्तके प्रकाशित.

- प्रकाश अर्जुन **भामरे :** एम०ए०,बी०एड०,एम०फिल०, सेट व नेट परीक्षा उत्तीर्ण. मराठी विभागप्रमुख, ग०तु० पाटील महाविद्यालय, नंदुरबार. उत्तर महाराष्ट्र विद्यापीठाच्या मराठी अभ्यास मंडळाचे सभासद. प्रथम व द्वितीय वर्ष, कला आणि प्रथम वर्ष, वाणिज्य यांसाठीच्या पाठ्यपुस्तक संपादन मंडळांचे सभासद.



अनुक्रमणिका

- दिवाकर **मोहनी** मुद्रणतज्ज्ञ. लिपीतज्ज्ञ. विवेकवादाला वाहिलेल्या 'आजचा सुधारक' ह्या नियतकालिकाच्या संपादक-मंडळाचे सदस्य.

- सीताराम **रायकर** : मॉडर्न महाविद्यालय, पुणे येथून इंग्रजीचे प्राध्यापक व उपप्राचार्य म्हणून निवृत्त. प्रोग्रेसिव्ह एज्युकेशन सोसायटीचे काही काळ चिटणीस. वाईच्या प्राज्ञ पाठशाळा मंडळाचे काही काळ चिटणीस व सध्या उपाध्यक्ष. म० फुले ह्यांचे 'त्रिरत्न' हे नाटक प्रकाशात आणले. महाराष्ट्र शासनाचे पारितोषिक.

- सलील **वाघ** : बंगळुरू व मुंबई येथील काही जाहिरात कंपन्यांमध्ये स्टूडियो मॅनेजर म्हणून व 'स्प्रिंगर' ह्या आंतरराष्ट्रीय प्रकाशनगृहात विभाग-प्रमुख म्हणून नोकरी केल्यानंतर आता संगणकीय मुद्रायोजन व तांत्रिक सेवा देण्याच्या स्वतंत्र व्यवसायात. 'रेसकोर्स आणि इतर कविता'सह एकूण चार कवितासंग्रह प्रकाशित. शमशेर बहादूर सिंह ह्यांच्या हिंदी कवितांचा मराठीत परिचय करून देणारे पुस्तक प्रकाशित. अनुष्टुभ, कवितारती, परिवर्तनाचा वाटसरू, नवाक्षरदर्शन, खेळ, कालनिर्णय ह्यांसह अनेक नियतकालिकांतून व वर्तमानपत्रांतून कविता प्रसिद्ध. २००६चा पहिला 'शब्दवेध' सन्मान प्राप्त. कवितांचे इंग्रजी, हिंदी व मणिपुरी भाषांत अनुवाद प्रसिद्ध. रॅडिकल ह्यूमनिस्ट चळवळीशी संबंधित.

- डॉ० धनंजय **वैद्य** : एम०बी०बी०एस०, पीएच०डी०, इंग्रजीत हृद्रोगविषयक लेखन, 'आजचा सुधारक'मध्ये लेख.

**वर्गणीचे नवीन दर (१ जानेवारी, २०१०पासून)**

विद्यार्थी वर्गणीदार : रु० ७५/-

वार्षिक वर्गणीदार : व्यक्तींसाठी : रु० १००/- पंचवार्षिक : रु० ४५०/-
संस्थांसाठी : रु० १५०/- पंचवार्षिक : रु० ६५०/-

आजीव सभासद : रु० १०००/- + १००/- (नोंदणी शुल्क) = रु० ११००/-
(फक्त व्यक्तींसाठी. संस्थांना आजीव सभासदत्व उपलब्ध नाही.)

**जाहिरातीचे नवीन दर (१ जानेवारी, २०१०पासून)**

पूर्ण पान : रु० ३०००/-

अर्धे पान : रु० २०००/-

आवरण-पृष्ठ (क्र० २, ३) : रु० ४०००/-

आवरण-पृष्ठ (क्र० ४ = मलपृष्ठ) : रु० ५०००/-

विशेष रंगीत पृष्ठ : रु० १००००/-

